


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रम



- **मुखपृष्ठ : शासकीय मुद्रण तंत्र संस्था मुंबई यांच्या सौजन्याने उपलब्ध झालेल्या शुभेच्छा पत्रांमधील चित्रांवरुन -एका जुन्या छापखान्याचे १५६८ मध्ये जर्मनीत प्रकाशित झालेले चित्र.**

---


- प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव ९ प्रिया, ९ वरळी सीफेस मुंबई ४०० ०२५. दूरध्वनी (९५२२) ४९५ १७००
- व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ५४३ ३८६९
- पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.
- सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९.

संपादकीय

# अर्थ जुने : भाषासंदर्भ नवे

इ. स. २००० चा हा शेवटचा अंक. वर्षांमागून वर्षं जातात. काळाचं चक्र फिरत असतं आणि भाषेचा प्रवाह वहात असतो. आपण आपल्या कुवती समजुतीप्रमाणे त्यांना आकडे-नावं देत असतो. काळ आणि भाषा यांच्याइतकंच आपलं जीवनही गतिमान असतं (कधी कमी, कधी जास्त) आणि तिन्हींचा परिणाम आपल्यावर होत असतो.

बदलत्या जीवनाचे संदर्भ समजल्याशिवाय भाषा कळत नाही. भाषेत रूजलेले समाजजीवनाचे संदर्भ कळल्याशिवाय भाषेला अर्थ प्राप्त होत नाही. व्याकरणाचे नियम आत्मसात केले आणि शब्दांचे अर्थ माहीत झाले म्हणजे भाषा 'आली ' असं नाही, हे आपल्या सगळ्यांनाच माहीत आहे. त्याचं एक गंमतीचं, जुनं उदाहरण नेहमी दिलं जातं तेही आपल्याला माहीत आहे. ' कोपऱ्यात काठी नाही, दारात जोडा नाही, खुंटीवर पागोटं नाही ' म्हणजे आपला नवरा घरात नाही हे त्या धर्मपत्नीला सांगायचंय हे काही केल्या 'मराठी भाषा आता आपल्याला यायला लागलीय' असं समजणाऱ्या परभाषकाला उमजत नाही.

भाषेत रुजलेले हे सांस्कृतिक संदर्भ कधी कधी आपल्याला - निजभाषकांनाच - पार अनोळखी होऊन जातात. काळाच्या ओघात समाजात इतक्या घडामोडी होऊन गेलेल्या असतात की, त्या घडामोडींचे संदर्भ लक्षात घेतले नाहीत तर भाषा आपल्याला तिच्यातल्या अर्थाचा पत्ता लागू देत नाही. विंदा करंदीकरांच्या ' धोंड्या न्हावी' या कवितेतल्या ओळीच पहाः

धोंड्या न्हावी<br>
महिन्यातून कधी तरि<br>
हळूच येतो अमुच्या मागिलदारी<br>
आणिक नंतर<br>
खोपटिच्या माघारी जाऊन करितो अद्‌भुत काही<br>
जे न कुणीहि आम्हा पाहू देई.

(''धोंड्या न्हावी'', विंदा करंदीकर, 'संहिता', संपादक मा. मंगेश पाडगावकर, कॉन्टिनेन्टल पुणे, १९७५,)

विद्यापीठीय विद्यार्थ्यांसमोर या कवितेबद्दल एकदा कवी विंदा करंदीकर म्हणाले, (साधारण १९८६-८७ साली), अलीकडे कवितावाचनाच्या कार्यक्रमात असा अनुभव येतो की तरुण पिढीतील श्रोत्यांना या ओळींचा अर्थ समजत नाही. पण कविता श्रोत्यांना कळत नाही याचं

वाईट वाटण्याऐवजी, आता हा अर्थ कळत नाही याचा मला अत्यानंद होतो. तो अर्थ सहज कळावा अशी सामाजिक परिस्थिती राहिली नाही ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे.

सोवळ्या बाईला ज्या दिव्यांतून जावं लागत होतं तो तिचा भोग नाहीसा झाला. स्त्रियांची परिस्थिती या शतकात झपाट्यानं बदलली आणि अनेक अनिष्ट रूढी इतिहासजमा झाल्या. पण रूढींचा काच पूर्णपणे सुटला असं नाही. त्याचे अवशेष राहिलेच. त्यांचं स्वरूप सौम्य झालं आणि ते वेगळ्या रूपात भाषेत व्यक्त झालं. 'आहे मनोहर तरी ... ' मधला हा सुनीताबाई देशपांड्यांचा अनुभवः '' ... काठपदरही नसलेली खादीची पांढरी साडी, कोरं कपाळ, हातात किंवा गळ्यात वगैरे कोणताही अलंकार नाही, अशीच मी राहत असे. भाईची ओळख झाली आणि वाढली तरीही. एकदा गंमत झाली. रस्त्यात मला माझ्या एक जुन्या शिक्षिका समोरून येताना दिसल्या. मी थांबून त्यांना नमस्कार केला. माझ्या त्या अवताराकडे, विशेषतः कपाळाकडे, त्यांचे लक्ष गेले आणि '' सुनीता का ग ? अरे, अरे ! असे म्हणून माझ्या खांद्यावर थोपटून, काहीही न बोलता, चेहरा पाडून त्या निघून गेल्या. इतक्या लहान वयात माझ्या वर 'असा प्रसंग ' आल्याने त्या अवाक झाल्या असाव्या हे मागाहून माझ्या लक्षात आले आणि हसू आले. '' पृ. १९१-९२ (आहे मनोहर तरी, ... सुनीता देशपांडे, मौज, १९९०)

सुनीताबाई चाकोरीबद्ध नव्हे तर स्वतंत्र बाण्याने जगताहेत, आणि त्यांच्या शिक्षिका तत्कालीन स्त्रीजीवनाशी निगडित असलेल्या चिन्हीयतेतून त्यांच्याकडे पाहात आहेत, या विरोधातून निर्माण झालेला हा प्रसंग. काळ, सामाजिक परिस्थिती, लोकमनात रूजलेल्या कल्पना, संवेदना यांच्याशी परिचय असल्याशिवाय इतक्या अलीकडच्या लेखनातलाही हा उतारा आणखी काही वर्षांनी पूर्णत्वाने समजणार नाही. (हीही भाग्याचीच गोष्ट आहे.)

भाषेचं अंतरंग जाणून घेताना आपल्या जीवनातले संदर्भच आपण वापरत असतो. परभाषेचं अंतरंग कधीकधी चटकन उकलत नाही ते व्याकरण, शब्दार्थ न कळल्यामुळे नव्हे तर, निजसंस्कृतीतल्या संदर्भातून परभाषेकडे पाहतो म्हणून. याचं हे एक गंमतीशीर उदाहरणः

माझ्याकडे मराठी शिकणाऱ्या अमेरिकन विद्यार्थ्याला मी सानेगुरूजींची एक कथा वाचायला दिली. त्या कथेत वडील आणि मुलगा यांच्यातला एक संवाद आहे. आपण पसंत केलेल्या मुलीशी मुलानं लग्न करावं या मुद्यावरून बापलेकात संभाषण चालू आहे. वडलांची निवड मुलाला मान्य नाही. तो आपला विरोध मांडतोय. त्या बोलाचालीत निवेदक म्हणतो, ''मुलाची मान खाली असल्यामुळे त्याच्या डोळ्यातले दुःखाचे अश्रू वडलांना दिसले नाहीत ?'' इतका साधा सोपा प्रसंग वाचताना माझा विद्यार्थी या वाक्याशी अडखळला आणि म्हणाला, ''मला नाही हे कळलं. '' त्याच्या भाषिक प्रगतीची मला खात्री असल्यामुळे त्यात याला न कळण्यासारखं काय आहे हे मला कळेना. तरीही मी त्याला त्या वाक्याची रचना, शब्दांचे अर्थ

सांगितले. त्यावर वैतागून तो म्हणाला, '' ते सांगू नका. मला ते सगळं कळलंय. मला या वाक्याचं प्रयोजनच कळलेलं नाही. तो मुलगा कसा उभा आहे आणि कुठे बघतोय याचा काय संबंध ? वडलांना ते कसं दिसणार?''

आता मी वैतागले. बापमुलात समोरासमोर घडणारा हा साधा प्रसंग त्याला का कळू नये म्हणून चक्रावले.

तेवढ्यात त्यानंच एकदम कोडं सुटल्यासारखा आनंदोद्गार काढला आणि तो हसायला लागला. तो म्हणाला, ''मी अडाण्यासारखं समजून चाललो होतो की हे संभाषण फोनवर चाललंय. मग ते एकमेकांना कसे दिसणार ? मी गेली १० वर्ष घरापासून लांब आहे. तीन हजार मैलांवर. त्यातून आम्ही अमेरिकन यंत्रावलंबी. माणसांशी संपर्क फोन इत्यादी माध्यमांतून अधिक.''

संदर्भ, सामाजिक जीवन आणि काळ यांचं भाषेशी अर्थपूर्ण नातं जोडल्याखेरीज भाषा बोलकी होत नाही हेच खरं.

आपलं जीवन फारच झपाट्यानं बदलत चाललं आणि त्या गतीशी जुळवून घेता आलं नाही तरी भाषा आपल्याला किती अडाणी ठरवते पहाः

एक बाई आपल्या घराबाहेरच्या टपालपेटीशी जाऊन, आपल्याला पत्रं आली आहेत का हे पुन्हा पुन्हा पहात होती. तिच्या तशा तीन-चार येरझारा झालेल्या शेजारणीनं पाहिल्या, म्हणून तिनं विचारलं, ''कुठल्या महत्त्वाच्या पत्राची वाट पहात्येस का ? पोस्टमन यायला अजून खूप वेळ आहे. त्यावर ती बाई म्हणाली, '' अगं मी संगणकासमोर बसल्येय आणि तो मला सारखं सांगतोय 'तुमच्यासाठी टपाल आलंय', म्हणून. You've got mail. !!'' संदर्भ जुने आणि यंत्रावतार नवा या कात्रीत सापडलेल्या एका अमेरिकन बाईची ही फसगत.

***

खुलासा

वर्ष १८ अंक : ३ पावसाळा २००० च्या मुखपृष्ठाचे वर्णन द्यायचे राहून गेले होते. ते पुढील प्रमाणे '' मुंबईला १८३८ मध्ये ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी छापून प्रकाशित केलेल्या 'चमत्कारिक गोष्टी' (मराठीतील पहिल्या काही छापील गंथापैकी एक )या पुस्तकातील एक पान ( आया आणि मडम यांची गोष्ट)

-संपादक

सूचना फलक

## पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी (वृत्तपत्रे आणि पुस्तक नोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यावर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते, ते निवेदन).

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र.

२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये.

३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४ एरंडवणे, पुणे- ४११००४

४. मुद्रणस्थळ : सिध्दि एन्टरप्रायजेस, कोथरुड, पुणे २९.

५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता: मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३ प्रमाणे.

६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : विजया देव- प्रिया, ९ वरळी सीफेस मुंबई ४०० ०२५. दूरध्वनी (९५२२) ४९५ १७००

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्याचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते : मराठी अभ्यास परिषद, द्वारा: अशोक रा. केळकर, ७ धनंजय सोसायटी, ७५९/८३ शिवाजीनगर, पुणे ४११००४

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते, की वर दिलेल्या तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

मृणालिनी शहा
प्रकाशक





अनुक्रमणिका

# गोव्याची राजभाषा कोकणी की मराठी ?

वि. बा. प्रभुदेसाई

एखाद्या राज्याची 'राजभाषा' कोणती हा वादाचा विषय न होता ती स्वाभाविकपणेच 'सर्वेषाम् अविरोधेन' निश्चित होण्यासारखे दुसरे भाग्य नाही. कारण एखाद्या राज्याचा लोकव्यवहार ज्या भाषेतून किंवा ज्या भाषांतून चालतो त्यांनाच 'राजभाषा' म्हणून मान्यता देण्याची सर्वसामान्य प्रथा आढळते. गोव्यातील 'राजभाषे'चा प्रश्न उपस्थित झाला तो गोवा हा पोर्तुगीज राज्यकर्त्यांच्या मगरमिठीतून दि. १९ डिसेंबर १९६१ रोजी मुक्त झाल्यावरच. गोव्याच्या बरोबरीनेच दमण आणि दीव या गुजरातीभाषिक पोर्तुगीज वसाहती १९६१ सालीच मुक्त झाल्यावर 'गोवा, दमण आणि दीव' या केंद्रशासित संघ प्रदेशाचा कारभार चालवला जात असे तो पणजी या गोव्याच्या राजधानीमधूनच. पोर्तुगीजांच्या राजवटीत गोमंतकातील रज्यकारभाराची भाषा पोर्तुगीज असली तरी सरकारी गॅझेटमध्ये प्रसिद्ध होणाऱ्या काही कायद्यांची व हुकूमनाम्यांची थोड्याफार प्रमाणात मराठीत भाषांतरे देण्याचीही प्रथा रूढ होती. इतकेच नव्हे तर, उच्च स्तरावरील शिक्षणक्रमात पोर्तुगीज, फ्रेंच व लॅटिन या भाषांच्या जोडीनेच संस्कृत व मराठी भाषांचाही अंतर्भाव करण्यात आता होता, याचे पुरावे आढळतात. पोर्तुगीजांचे हिंदुस्थानात आगमन होण्यापूर्वी आणि नंतरही बराच काळपर्यंत गोमंतकातील स्थानिक बोली जी कोकणी तिचा वापर केवळ तोंडी (मौखिक) व्यवहारापुरताच होत असे आणि लेखन, वाचन, शिक्षण, कथाकीर्तन, भजन, प्रचवन, व्याख्याने इत्यादी सांस्कृतिक कार्यासाठी मराठी भाषेचाच आवर्जून उपयोग करण्याची परंपरा पुरातन काळापासून चालत आलेली होती. त्यामुळे गोव्यातील बहुसंख्य जनतेच्या सांस्कृतिक व्यवहाराची भाषा मराठीच आहे हे सूर्यप्रकाशा-एवढे स्पष्ट होते. गोव्याची राजभाषा कोकणी की मराठी की दोन्ही हा प्रश्न उपस्थित झाला तो नंतरच्याच काळात.

### गोव्यातील राजभाषेचे राजकारण

गोव्यात बोलली जाणारी कोकणी ही प्रमाण मराठी भाषेचीच एक वैशिष्ट्यापूर्ण बोली मानायची की ती स्वतंत्र भाषा मानायची या विषयाभोवती गोव्याच्या 'राजभाषां' चे राजकारण अजूनपर्यंत घोटाळत राहिले होते. दिल्लीच्या साहित्य अकादमीने 'भारताची एक स्वतंत्र अर्वाचीन वाङ्मयीन भाषा' म्हणून कोकणीला १९७५ साली मान्यता दिल्यावरही ही समस्या अजून संपलेली नाही. किंबहुना गोव्यातील कोकणी व मराठी यांच्या परस्पर संबंधाचे





अनुक्रमणिका

खरे दुखणे हे केवळ कोकणीला प्रमाण मराठीची बोली मानायचे की एक स्वतंत्र भाषा एवढ्यापुरतेच मर्यादित कधीही नव्हते. या वास्तवाकडे अभ्यासकांचे मुद्दाम लक्ष वेधावेसे वाटते. या दृष्टीने गोवा पोर्तुगीजांकडून जिंकून घेण्याच्या किती तरी आधी म्हणजे १९४५ सालच्या बहुभाषाकोविद व नामवंत साहित्यिक श्री. काकासाहेब कालेलकर यांनी मुंबई येथे केलेल्या गोमंतक मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणात उमटलेले तत्संबंधित परखड पडसाद आपल्याला भविष्यकाळातील घटनांचे कसे सूचक वाटतात ते पाहा. काकासाहेब आपल्या १९४५ सालच्या अध्यक्षीय भाषणात म्हणतात, ''मला स्वत:ला वाटते की, कोकणी आणि मराठी यांच्यामध्ये विशिष्ट अद्वैताचा संबंध आहे. एक गोष्ट सर्वांनाच कबूल करावी लागेल की, कोकणीला जर अत्यंत जवळची एखादी भाषा असेल तर ती मराठीच होय. गोव्याच्या आसपास जो प्रदेश आहे तेथे मुख्यत्वे मराठी भाषाच चालते. गोव्यामध्ये फार प्राचीन काळापासून कोकणी भाषाच बोलली जाते, आणि तेथे मराठीचे अध्ययन आणि सेवन ही तितक्याच प्राचीन काळापासून होत आले आहे.''

गोव्यातील कोकणीची कैफियत मांडताना काका कालेलकर पुढे सांगतात, '' कोकणीवाले म्हणतात की, 'आमच्या प्रांतात अगदी पूर्वीपासून कोकणीच भाषा बोलली जाते. या कोकणीमध्ये आज साहित्य फारसे नसेल, पण आज या भाषेमध्ये उच्च कोटीची साहित्यिक क्षमता आहे. या भाषेतील म्हणी, वाक्प्रचार आणि प्रेमगीते ही हिची शक्ती व्यक्त करण्यास पुरेसा पुरावा देऊ शकतात. आम्हाला मराठी घेऊन काय करावयाचे आहे? मराठी बोलणारे लोक आम्हांला हेंगाडे म्हणतात, आमचा उपहास करतात हे आम्हांला कसे विसरता येईल ? आमच्या प्रांतात फक्त एकटी कोकणीच चालेल. प्रांताबाहेरचे प्रश्न सोडविण्यासाठी महात्माजींनी आपल्याला राष्ट्रभाषा म्हणून हिंदुस्थानी दिली आहेच. प्रथम कोकणी शिकू, त्यानंतर हिंदुस्थानी असा अभ्यासक्रम ठरल्यानंतर मराठीची गरजच कोठे राहते? मराठीचा जाच आम्ही पुष्कळ सहन केला. मराठीने आमच्या स्वाभिमानावर आणि अस्तित्वावरच घाला घातला आहे. तेव्हां आम्ही फक्त कोकणीलाच चिकटून राहू, तिचीच सेवा करू, तिचेच साहित्य वाढवू आणि तिला सर्व प्रकारे समर्थ करु . आमची निष्ठा फक्त कोकणीलाच वाहिलेली असेल.''

### काकासाहेबांकडून कोकणी राजभाषेचे सूतोवाच

'ऋषीणां पुनराद्यानां वाचम् अर्थोऽनुधावति' असे संस्कृतात जे एक वचन आहे, त्याचा पुरेपूर प्रत्यय काकासाहेबांच्या प्रस्तुत अध्यक्षीय भाषणांतील पुढील भविष्यवाणीत येतो. काकासाहेब लिहितात, '' आपल्याला एवढे कबूल केले पाहिजे की, गोव्यात पोर्तुगीज भाषेचे राज्य दूर करून तिच्या जागी लोकभाषेचे राज्य जर स्थापावयाचे असेल तर ते स्थान कोकणीलाच





अनुक्रमणिका

द्यावे लागेल. गोव्यामध्ये आज जर एखाद्या देशी भाषेला राजभाषा बनविणे शक्य असेल, तर सरकारदरबारात कोकणीलाच हे स्थान देणे शक्य आहे. यासाठी मराठीवाल्यांनी कोकणीच्या मदतीला धावून गेले पाहिजे. म्हणजे सरकारदरबारात आणि शिक्षणक्षेत्रातही कोकणीला प्राधान्य देणे सरकारला अपरिहार्य होईल. ज्याला ज्याला म्हणून गोव्याचे हित करावयाचे असेल, त्याने मराठी आणि कोकणी या दोन्ही भाषांची एकत्र सेवा करण्याची दीक्षा घेतली पाहिजे. मला ठाऊक आहे की, गोव्यातील किरिस्तांव लोक घरी कोकणीच बोलतात. त्यांच्यापैकी फारच थोडे मराठी शिकतात. काही किरिस्तांव पोर्तुगीज शिकतात. (गोमंतक मराठी साहित्य संमलेन अध्यक्षीय व स्वागताध्यक्षीय भाषणे, पणजी १९९२, पृष्ठ ९८ ते १०१) काकासाहेबांच्या कडक तालमीत तयार झालेल्या श्री. रवीन्द्र केळकर, चंद्रकांत केणी, पुरुषोत्तम काकोडकार, लक्ष्मणराव सरदेसाई , बा. भ. बोरकर यांच्यासारख्या मराठीतून अव्वल दर्जाची साहित्यनिर्मिती करण्याची क्षमता असलेल्या गोमंतकीय लेखकांनीच कोकणीला एक स्वतंत्र राजभाषेची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याची चळवळ नेटाने चालवून ती गोव्यात आणि राजधानी दिल्लीच्या पातळीवरही यशस्वी करून दाखवली, यात काही शंका नाही. काका कालेलकरांचे, गोव्यातील किरिस्तांव हे घरी कोकणीच बोलतात आणि नव्या पिढीतील किरिस्तावांचा मराठीतून असलेला पूर्वापार संबंध आता ऐतिहासिक कारणांमुळे फारच कमी झाला आहे, हे निरीक्षण महत्त्वाचे आहे.

भारताचे पहिले पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू हे नेहमीच गोव्यावरील लॅटिन संस्कृतीच्या प्रभावाची भलावण करताना उघडपणेच प्रशस्तिपत्र देत असत.- ''Goa has a speeciality of its own. The Konkani language has a speciality about it as the language of Goans. Due attention should be given to its development. Marathi would also be able to function in freedom.'' प्रारंभी मराठीतील ग्रंथरचनेला कडाक्याचा विरोध झाला त्यावेळी आपल्या संतकवींना देखील खडा सवाल उपस्थित करावा लागलाच की नाही? ' संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत काय चोरापासूनि आली ।'

### राजभाषा निर्मितीच्या दृष्टीने आणखी काही ऐतिहासिक घटना

गोव्यातील 'राजभाषे' च्या निश्चितीसाठीची पार्श्वभूमी जाणून घेण्यासाठी आणखी काही ऐतिहासिक महत्त्वाच्या घटनांचा येथे निर्देश करणे आवश्यक वाटते. गोवा हा पोर्तुगीजांनी आदिलशहाकडून इ.स.१५१० साली जिंकून घेतला तो दि. १९ डिसेंबर १९६१ पर्यंत त्यांच्याच ताब्यात राहिला होता. या साडेचारशे वर्षांच्या कालवधीत गोवा, दमण व दीव या हिंदुस्थानातील तीनही पोर्तुगीज वसाहतींचा राज्यकारभार हा अर्थातच पोर्तुगीज भाषेतून चालणे स्वाभाविकच होते. गोवा मुक्तीनंतर हळूहळू पोर्तुगीज भाषेची जागा इंग्रजीने घ्यायला सुरुवात केली. तरीपण १९६४ च्या जानेवारीत गोव्यातील निर्वाचित अशा आमदारांचे गोवा, दमण व दीव या

संघप्रदेशांच्या विधान सभेचे पहिले अधिवेशन भरले त्यावेळी पहिले सभापती ॲड. पां. पु. शिरोडकर यांची पूर्वअनुमती घेऊन प्रत्येक आमदाराला इंग्रजीत किंवा मराठीत किंवा कोकणीत आपापले विचार व्यक्त करण्याची मुभा होती असे समजते. मुक्त गोव्यातील पहिले सरकार स्थापन करण्याची संधी लाभली ती बहुमताने निवडून आलेल्या 'महाराष्ट्रवादी गोमंतक पक्षाला'. गोव्याचे महाराष्ट्रात विलीनीकरण करण्याचे प्रमुख उद्दिष्ट समोर ठेवून श्री. भाऊसाहेब बांदोडकर यांच्या नेतृत्वाखाली स्थापन झालेल्या 'म. गो. पक्षा' च्या घटनेनुसार मराठी हीच गोव्याच्या राज्यकारभाराची प्रमुख भाषा करण्याचे ध्येय होते. पण 'म. गो.पक्षाच्या' गोव्यातील दीर्घकालीन राजवटीत काहीं ना काही कारणाने 'गोव्याची राजभाषा ही मराठीच' असा ठराव गोवा विधानसभेत आला असता तर तो बहुमताने मंजूर व्हायला कोणतीही अडचण निर्माण झाली नसती. पण प्रत्यक्षात मात्र मराठीसंबंधीचा असा ठराव त्यावेळी झाल्याची नोंद आढळत नाही, ही वस्तुस्थितीच आहे.

**महाराष्ट्रातील विलीनीकरणाचा जनमत कौल विरोधात गेला.**

गोवा स्वतंत्र ठेवावा का त्याचे महाराष्ट्र राज्यात विलीनीकरण करावे यासंबंधीचा केंद्र सरकारने दि. १६ जानेवारी १९६६ रोजी घेतलेला गोवकरांचा जनमत कौल हा बहुमताने विलीनीकरणाच्या विरोधात गेला मात्र, त्यानंतर लगेच झालेल्या गोवा विधानसभेच्या निवडणुकीत 'महाराष्ट्रवादी गोमंतक पक्ष' हाच प्रचंड बहुमताने निवडून पुन्हा अधिकारावर आला ! कोकणीला 'भारताची एक स्वतंत्र अर्वाचीन वाङ्मयीन भाषा' म्हणून दिल्लीच्या साहित्य अकादमीची मान्यता मिळाली ती १९७५ साली. या संदर्भातील गोवा विधानसभेचे पहिले सभापती व ज्येष्ठ स्वातंत्र्य सैनिक ॲड पां. पु. शिरोडकर यांनी केलेले पुढील परखड भाष्य खूपच बोलके आहे असे म्हणावे लागेल. ''साहित्य अकादमीचे अध्यक्ष डॉ. सुनीतिकुमार चतर्जी हे कोकणीला एक स्वतंत्र भाषा म्हणून साहित्य अकादमीकडून मान्यता घेताना डॉ. सुमित्र मंगेश कत्रे या मंगळूरकडील सारस्वत विद्वानाच्या लिखाणाने प्रभावित झाले होते ही गोष्ट स्पष्ट आहे.'' (S.M. Katre, The Formation of Konkani, Bomhoy, 1942). डॉ. कत्रे यांनी ज्या सहा प्रातिनिधिक बोलींचा व्याकरण, शब्दकोश, शब्दसंग्रह व आधुनिक साहित्य यांच्या दृष्टीने अभ्यास केला आहे, त्यामध्ये गोव्याच्या उत्तरेकडील सिंधुदुर्ग, रत्नागिरी जिल्ह्यातील तसेच पूर्वेकडील सुपे, हल्याळ, लोंढा, चंदगड आधी भागांतील बोलींची अजिबात दखल घेतलेली नाही ही गोष्ट चिंतनीय होय. याहीपेक्षा, ॲड. शिरोडकर यांचा महत्त्वाचा आक्षेप आहे तो असा, शणै गोंयबाब ऊर्फ वामन रघुनाथ वर्दे वालावलीकर (कोकणीची व्याकरणी बांदावळ, मुंबै १९४९, या पुस्तकाचे लेखक) यांनी गोव्यातील जुन्या काबिजादीत व फोंडे महालात वास्तव्य करणाऱ्या व विशेषतः,

स्मार्त व साष्टीकर या संज्ञांनी ओळखल्या जाणाऱ्या सारस्वतांचीच बोली तेवढी कोकणी मानली आहे, ही गोष्ट स्पष्ट होते. साहित्य अकादमीने मान्यता दिलेली कोकणी ही काही झाले तरी छोट्याशा गोव्यातील ही एका छोट्याशा जातीची ( की जिचे गोव्याच्या लोकसंख्येत शेकडा पाच टक्के सुद्धा प्रमाण नाही, अशी ) बोली आहे, ही गोष्ट विसरता येण्यासारखी नाही. ही जात छोटीशी असली तरी हिंदू असल्यामुळे मराठी ही ज्या देवनागरी लिपीतून लिहिली जाते तीच कोकणीचीही लिपी असे ठरविण्यात आले. यामुळे बहुतकरुन सर्व ख्रिश्चनांच्या (की ज्यांचे गोव्याच्या एकंदर लोकसंख्येत सुमारे अठ्ठावीस टक्के प्रमाण आहे, त्यांच्या ) दबावामुळे कोकणीला राजभाषा म्हणून फेब्रुवारी १९८७ मध्ये मान्यता मिळाली. या घटनेचे प्रारंभी जरी ख्रिश्चनांनी विजयोत्सव साजरे केलेले असले, तरी देवनागरी लिपीची जोड कोकणीशी घातल्यामुळे ह्यांच्यात वैफल्याचे वातावरण निर्माण झालेले आहे, ही गोष्टही तितकीच खरी आहे.

''शणै गोंयबाब हे महाराष्ट्राला 'मराठण' असे म्हणत. जे जे लोक मराठी बोलतात किंवा स्वत:ला मराठे किंवा क्षत्रिय म्हणवतात ते सर्व 'मराठणातले' आणि म्हणूनच अशा लोकांची बोलीसुद्धा कोकणी नव्हे. मराठी हीच गोव्याची भाषा असून ह्यातील निरनिराळ्या जातींत व विभागांत बोलल्या जाणाऱ्या कोकणी बोली या मराठीच्या बोली आहेत.'' डॉ. सु. मं. कत्रे यांनी भाषाशास्त्रीयदृष्ट्या कोकणीची वेगळी म्हणून दाखविलेली बहुतेक सर्व वैशिष्ट्ये, तिला एका स्वतंत्र भाषेचे स्थान द्यावयाला पुरेशी नाहीत, असेही ॲड. शिराडेकर यांचे स्पष्ट प्रतिपादन आहे. (पां. पु. शिरोडकर, इतिहासांच्या दृष्टिकोनातून गोमंतकातील मराठी परंपरेचा उद्‌गम व विकास, गो. म. अकादमी, पणजी गोवा १९९४.)

गोव्यातील स्वतंत्र भाषा म्हणून विकसित करण्यात आलेली कोकणी ही तेथील उच्चवर्णीपैकी एका अत्यंत छोट्याशा गटाने आपले बहुजन समाजावरील वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने खेळलेली एक मतलबी चाल असून ती भाषा गोव्यातील मराठे किंवा क्षत्रिय म्हणवून घेणाऱ्या सर्वसामान्य जनतेवर घोर अन्याय करणारी आहे, अशा आशयाच्या ॲड. शिरोडकरांच्या आक्षेपात बरेच तथ्य आहे. याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही.

### १९८७ सालचे गोवा, दमण व दीव संघप्रदेश राजभाषा विधयेक

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद क्र. ३४५ अनुसार प्रत्येक राज्याला आपापली राजभाषा ठरविण्यासाठी राजभाषा कायदा करण्याचा अधिकार त्या त्या राज्यांतील विधिमंडळाला देण्यात आला आहे. अशा प्रकारचे गोवा, दमण व दीव या संघप्रदेशासाठीचे राजभाषा विधेयक दि. ४ फेब्रुवारी १९८७ रोजी मंजूर झाले व दि. १४ एप्रिल १९८७ रोजी राज्यपालांनी त्याला अनुमती दिल्यावर दि. १४ मे १९८७ पासून हा राजभाषा कायदा अमलात आला. या राजभाषा विधेयकानुसार देवनागरी लिपीतील कोकणी ही गोव्याची राजभाषा निश्चित झाली असून

शासकीय, शैक्षाणिक, सांस्कृतिक इत्यादी क्षेत्रांतील व्यवहारासाठी कोणताही भेदभाव न करता मराठीचा वापर करण्याची मुभा कायद्यानुसारच देण्यात आली आहे. त्यांनतर गोव्याला स्वतंत्र घटक राज्याचा दर्जा दि. ३० मे १९८७ रोजी देण्यात आला आणि १९९३ साली भारतीय संविधानाच्या आठव्या परिशिष्टात कोकणी भाषेचा समावेश करण्यात आला. गोव्यातील राजभाषेच्या दृष्टीने या एका पाठोपाठच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या घटना त्यांच्या क्रमवारीनेच लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. १९८७ सालचे राजभाषा विधयेक हे गोवा, दमण व दीव या संघप्रदेशासाठी म्हणून मंजूर करण्यात आले होते.

## राजभाषा विधयेकाच्या प्रास्ताविकातील महत्त्वाचा खुलासा

गोवा राज्यात ९५ टक्के लोक कोकणी बोलतात, यासाठी कोकणी हीच या प्रदेशाची लोकभाषा ठरते, असे प्रस्तुत राजभाषा विधेयकाला जोडलेल्या प्रास्ताविकात स्पष्ट केले आहे. तसेच, गोव्यात बऱ्याच लोकांकडून मराठीचाही वापर केला जातो, यासाठी या राजभाषा विधयेकात मराठीलाही बरेच महत्त्वाचे स्थान दिले आहे. त्यानुसार गोवा सरकारला संपूर्ण कामकाजासाठी किंवा एखाद्या विशिष्ट कामकाजासाठी मराठीचा वापर करण्याची मुभा देण्यात आली आहे. याशिवाय शैक्षणिक, सामाजिक आणि सांस्कृतिक क्षेत्रांत देखील मराठीचा उपयोग करण्याच्या बाबतीत कोणताही भेदभाव केला जाणार नाही, हे स्पष्टपणे सांगितले आहे. तसेच, शैक्षणिक व सांस्कृतिक संस्थांना सरकारी अनुदान देण्याच्या संदर्भातही भाषेच्या मुद्द्यावरून कोणताही पक्षपात केला जाणार नाही, अशी तरतूद करण्यात आली आहे. गोमंतकीय जनता ही प्राधान्याने कोकणी बोलणारी नसूनही गोव्यातील मराठीवर कोणत्याही प्रकारचा अन्याय होऊ नये यासाठी, राजभाषा कायद्यात मराठीचे महत्त्व यत्किंचितही कमी न लेखता तिला मानाचे स्थान देण्यात आले आहे, असा खुलासा केला जातो. पण १९८७ साली गोव्याची राज्यभाषा ही एकमेव कोकणी व मराठीला समान वापरासाठीच्या सवलती देण्याचे विधेयक गोवा विधान सभेने संमत केल्यावर मराठी गोमंतकारांना दुय्यम व उपरे ठरवून अपमानित केल्यामुळे हा अन्याय दूर करण्यासाठी मराठीप्रेमी गोमंतकीय जनतेने उत्स्फूर्तपणे तीव्र आंदोलनाचा लढा उभारला होता, हे विसरता कामा नये. गोव्याची राजभाषा म्हणून 'मराठी'चा स्पष्ट निर्देश राजभाषा विधेयकात नसला तरी तिला कोकणीच्या जोडीनेच मानाचे स्थान दिलेले असल्याने मराठीच्या गोव्यातील वापराला व अस्तित्वाला कोणत्याही प्रकारे बाधा येण्याचे कारण नाही अशी त्यावेळी मखलाशी करून मराठी प्रेमींची पद्धतशीरपणे दिशाभूल करण्यात आल्याचे कालांतराने उघडकीला आले आहे.

मुंबई उच्च न्यायाल्याच्या निकालामुळे झालेला भ्रमनिरास भारतीय संविधानाने सर्व

राज्य सरकारांना स्थानिक नोकर भरतीचे नियम करण्याचा जो अधिकार दिला आहे, तो वापरून गोवा सरकारने काही शासकीय पदांसाठी कोकणी भाषेचे ज्ञान आवश्यक (essential) तर मराठीचे ज्ञान आवश्यक न ठेवता ते इष्ट (desirable) राहील अशी अट घालून नोकरीविषयक काही जाहिराती दिल्या होत्या. त्या वाचून गोव्यातील 'मराठी अकादमी' या दोन संस्थांनी प्रस्तुत सरकारी जाहिरातीतील मराठी भाषेला कोकणीच्या तुलनेने दुय्यम लेखाण्याच्या वृत्तीला मुंबई उच्च न्यायालयाच्या गोवा खंडपीठात आव्हान दिले होते. प्रस्तुत संदर्भात, गोवा राजभाषा विधेयकानुसार कोकणी व मराठी या दोन्ही भाषांचा दर्जा समान असल्याने कोकणी आवश्यक तर मराठी इष्ट अशी अट घालून या दोन भाषांमध्ये भेदभाव करणे अन्यायकारक ठरते असा या दोन्ही संस्थांचा युक्तिवाद होता. या युक्तिवादामुळे मुंबई उच्च न्यायालल्याला राजभाषा कायद्यातील मूळ तरतुदी नीटपणे तपासून पाहणे आवश्यक झाले. तशा प्रकारचा अभ्यास करून दि. ३० मार्च २००० रोजी न्यायमूर्तींनी निकाल दिला तो असा:- गोवा, दमण व दीव संघप्रदेशासाठीच्या १९८७ सालच्या राजभाषा कायद्यानुसार गोव्यात केवळ कोकणी हीच एकमेव राजभाषा आहे. सर्व प्रशासकीय कामकाजासाठी मराठीच्या वापराला राजभाषा विधेयकाने मुभा दिलेली असली तरी या दोन्ही भाषांचा दर्जा कायद्यानुसार समान ठरत नाही. अशा प्रकारे, 'मराठी राजभाषा प्रस्थापन समिती' आणि 'गोमंतक मराठी अकादमी' या दोन्ही संस्थांनी मराठीसंबंधीचा दावा न्यायाल्याने फेटाळून लावला आहे. मात्र, उच्च न्यायालयाने राजभाषा कायद्यात कोणताही फेरबदल सुचविलेला नाही, त्यामुळे एक प्रकारचा तिढाच निर्माण झालेला आहे ! हा तिढा कायद्याची बूज राखूनच हळुवारपणे व चतुराईनेच सोडवावा लागेल, यात काही शंका नाही.

### कोकणीच्या समर्थकांचा युक्तिवाद

कोकणी भाषेच्या समर्थकांच्या मते, गोव्यात मराठी ही लोकभाषा (लोकांची भाषा) नसल्यामुळेच तिला राजभाषेचे स्थान देणे उचित नाही. गोव्यातील मराठीवर तेथील विधानसभेने आणि उच्च न्यायलयानेही मुळीच अन्याय केलेला नाही. एवढेच नव्हे, तर गोवा राजभाषा कायद्यात मराठीला मानाचे स्थान देण्यात आले आहे. भारतातील कोणत्याही राज्यात लोकभाषा नसलेल्या भाषेला राजभाषा कायद्यात असे अपवादात्मक महत्त्वाचे स्थान दिलेले आढळत नाही. गोव्यात कोकणी ही राजभाषा आहेच; तिच्या बरोबरीनेच मराठीलाही राजभाषेचे स्थान दिले तर काय बिघडले, असा काहींचा युक्तिवाद आहे. पण एखादी भाषा ही त्या राज्यात ज्ञानाची भाषा किंवा सांस्कृतिक भाषा आहे , एवढ्याच कारणासाठी तिला राजभाषेचे स्थान दिले जात नाही. राजभाषा कायदा हा विशिष्ट हेतूने केला जात असून त्या हेतूच्या चौकटीत लोकभाषा





अनुक्रमणिका

असलेली केवळ कोकणी भाषाच बसते. याशिवाय गोवा राज्यात कोकणी आणि मराठी या दोन राजभाषा केल्या तर त्याचे काही दुष्परिणामही संभवतात. हे विपरीत परिणाम केवळ भाषेच्या क्षेत्रातले नसून गोमंतकीय जनतेच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय हितसंबंधांनाही बाधक ठरू शकतात, याकडे दुर्लक्ष करून कसे चालेल? नोकरीसाठी कोकणी आणि मराठी या दोन्ही भाषांचे ज्ञान आवश्यक, अशी अट घातली तर गोव्यातील अंदाजे ३० टक्के जनतेला, सरकारी नोकऱ्यांपासून दूर ठेवल्याचा दोष लागेल; कारण गोव्यातील काही समाजघटकांमध्ये शाळेत जाऊन मराठीचे ज्ञान संपादन करण्याची परंपरा नसल्यामुळे मराठी ज्ञान आवश्यक करणे कायद्याच्या कसोटीवर टिकणारे नाही. त्याऐवजी कोकणी किंवा मराठी यांपैकी एका भाषेचे ज्ञान आवश्यक, अशी अट घातल्यास तो गोव्यातील स्थानिक उमदेवारांच्या हितसंबंधांना मारक ठरणार आहे. म्हणजेच गोव्यातील नोकऱ्यांसाठीचे दार महाराष्ट्र आणि बृहन्महाराष्ट्रांतील सर्व मराठीभाषकांना खुले राहील. तसेच दोन राजभाषा केल्यास गोव्याच्या राजकीय भवितव्याच्या दृष्टीने ते द्विभाषिक आहे, असे गृहीत धरून जुन्या द्विभाषिक मुंबई राज्याप्रमाणेच गोव्याच्या विभाजनाचा धोका संभवतो. कारण महाराष्ट्र व कर्नाटक या राज्यांतील सीमावाद अजूनही संपलेला नसल्यामुळे, बेळगाव, कारवार व गोवा एकत्र आणून त्यांचे विशाल गोमंतक राज्य निर्माण करण्याचा यापूर्वीच राजकारण्यांनी सुचविलेला प्रस्ताव जोर धरण्याची शक्यता नाकारता येणार नाही. दोन राज्यांच्या सीमा प्रश्नावरील तोडगा म्हणून गोवा राज्याला बळीचा बकरा बनवण्याचे कारस्थान मुळातच उखडून टाकायला हवे. एकंदरीत मराठीला राजभाषेचा दर्जा न दिल्याने शिक्षण, साहित्य, कला, सांस्कृतिक उपक्रम इत्यादी क्षेत्रांतील तिच्या गोव्यातील अनिर्बंध वापरावर मुळीच प्रतिकूल परिणाम होणार नाही. मात्र, काही झाले तरी मातृभाषेची जागा अन्य भाषांना देणे अन्याय्य ठरेल. गोव्यातील लोकभाषा नसलेल्या मराठीला राजभाषेचा, दर्जा देणे हे आर्थिक सामाजिक आणि राजकीय संकटांना निमंत्रण दिल्यासारखे होईल. अशा प्रकारचा मराठीच्या विरोधातील विखारी प्रचार सुरू करून गोवा हितराखण मंत्राने एक आंदोलनच उभे केले आहे.

### मराठी युवा संघर्ष समितीचा निर्वाणीचा निर्धार

वास्तविकपणे पाहता, बहुसंख्य गोमंतकीय जनतेचा असा पक्का समज झाला होता की, कोकणी व मराठी या दोन्ही भाषांना १९८७ च्या राजभाषा कायद्याने समान दर्जाच दिला आहे. तसा कायदा कारणाऱ्यांनी मराठी भाषाभिमान्यांची तशी जाहीरपणे समजूत करून दिली होती. पण आता तेरा वर्षांनंतर म्हणजे इ.स. २००० साली, गोव्यात मराठीला कोकणीच्या बरोबरीचे राजभाषेचे स्थान नाही हे उच्च न्यायालयाच्या निर्णयामुळे स्पष्ट झाल्याने मराठीचा

सपशेल पराभव झाला असे मानून कोकणीप्रेमींनी आनंदोत्सव साजरा करणे धाडसाचेच ठरेल ! गोव्यातील मराठीला कसलेही लाभ मिळणार नाहीत अशा पद्धतीने तिला एकाकी पाडल्यावरच कोकणी वाढेल, असे मनचे मांडे कुणी खात असतील तर ते मूर्खांच्या नंदनवनातच नांदत आहेत असे म्हणावे लागेल. कारण कोकणी भाषेच्या मुळावर आली आहे ती इंग्रजी भाषा, मराठी नव्हे. कोणत्याही महत्त्वाच्या जनआंदोलनातील युवकांचा सहभाग हा त्या आंदोलनात नवसंजीवनी ओतीत असतो, त्यात आपला प्राण फुंकीत असतो असाच आतापर्यंतचा इतिहास सांगतो. गोव्यातील मराठीसाठीच्या सर्व आंदोलनांमध्ये युवकवर्गाने नेहमीच आपला सिंहाचा वाटा अत्यंत चोखपणे उचलला आहे. मराठी राजभाषेसाठीच्या विद्यमान चळवळीतही नव चैतन्यांचे वारे संचारले असून मराठी युवा संघर्ष समितीचे धडाडीचे युवा नेते व एक मराठी साहित्यिक श्री. विष्णू सूर्या वाघ यांनी म्हटल्याप्रमाणे, ''पाच शतकांहून अधिक काळ गोमंतकीय जनता मराठीच्या ज्ञानवृक्षाखाली विश्रांती घेत आली आहे. कोकणीच्या वृक्षाला नुकताच कुठे फुलोरा येऊ लागला असून त्याची पाळेमुळे अधिक खोल रुजावीत यासाठी खतपाणी घालण्याचे काम करायची आमची तयारी आहे पण कोकणीचे झाड मूळ धरते म्हणून आता मराठीच्या वृक्षाची गोव्याला गरज नाही असा युक्तिवाद करून संकुचित वृत्तीने कोणी पुढे सरसावला तर अशा सांस्कृतिक लाकूडतोड्यांची झुंज रोखण्याचाही निर्धार गोव्यातील मराठीप्रेमींनी केला आहे. तसे नसते तर चार शतकांपूर्वी फादर स्टीफन्सन आपले 'क्रिस्तपुराण' मराठीतून लिहिले नसते व त्यात मराठी भाषेचा माहिमाही गाइला नसता. पण इतिहासाचे वेगळे अन्वयार्थ लावू पाहणारे कोकणीभक्त मात्र मराठीविषयीच्या काविळीने पिवळे झाले आहेत. गोव्यातील बहुजनसमाजाला मराठीपासून तोडले तर त्याची स्थिती त्रिशंकूसारखी होईल. कोकणीप्रेमींना नेमके हेच अभिप्रेत आहे. हा धोका ओळखून प्रत्येक मराठी अभिमान्याने यावेळी निर्णायक लढ्यासाठी सज्ज राहावे'' त्यांनी हे अत्यंत कळकळीचे आवाहन केले आहे. याच विषयाचा खोलात जाऊन परामर्श घेताना श्री. विष्णू सूर्या वाघ असा खडा सवाल उपस्थित करतात की, ''कोकणी हीच गोव्याची लोकभाषा असती तर कोकणीतून निघणारे एकमेव दैनिक मांडवीच्या पलीकडे पन्नास प्रतीदेखील का खपवू शकत नाही? राजभाषा कायद्यात मराठीच्या स्थानाविषयी कुठलीच संदिग्धता मराठीप्रेमी खपवून घेणार नाहीत. कोकणीच्या बरोबरीने मराठीलाही राजभाषेचे अधिकार मिळावते ही आमची मागणी आहे. ती मान्य असेल तर त्यांना बरोबर घेऊन आम्ही पुढे जाऊ पण या मागणीला जे विरोध करतील त्यांचाही प्रतिकार करण्याची मानसिक सज्जता आम्ही ठेवली आहे;'' असे अत्यंत आत्मविश्वासपूर्ण उद्गार काढून वाघांनी गोव्यातील मराठीच्या समर्थकांना पूर्णपणे आश्वस्त केले आहे.





अनुक्रमणिका

## एकाच राज्यात अनेक राजभाषा असू शकतात याची उदाहरणे

भारतातील बहुतेक राज्यांतील त्या त्या राज्यात विशेष वापरली जाणारी लोकभाषा हीच त्या राज्याची राजभाषा मानण्याची सर्वसामान्य प्रथा आहे खरी. उदाहरणार्थ महाराष्ट्रात मराठी, गुजरातेत गुजराती, मध्यप्रदेशात हिंदी पण काही राज्यांमध्ये एकाहून अधिक राजभाषांना मान्यता देण्यात आल्याचीही उदाहरणे आपल्याच देशात आढळतात. उत्तर प्रदेशात हिंदी ही राजभाषा असली तरी काही भागात उर्दूचा उपयोग करण्याची तरतूद मूळ राजभाषा कायद्यातच करण्यात आली आहे. पश्चिम बंगालमध्ये बंगाली ही राजभाषा असली तरी दार्जिलिंग जिल्ह्यात नेपाळीचा उपयोग करण्याची व्यवस्था आहे. आसामच्या राजभाषा विधेयकानुसार आसामी भाषेच्या जोडीनेच बंगालीविषयी तर कर्नाटकात कन्नड भाषेच्या जोडीनेच तमिळ भाषेविषयी अशी तरतूद केलेली आढळते. आंध्र प्रदेशात तेलगू ही राजभाषा असली तरी मराठी, कन्नड व तमिळ या भाषांचा उपयोग त्या राज्याच्या वेगवेगळ्यात भागांत कायद्यानुसारच करता येतो. एवढेच कशाला, भारतातील सिक्कीम या राज्यात नेपाळी, भूटिया, लेपच्या आणि लिंबू या तेथील चार प्रमुख जमातींच्या चारही लोकभाषांना राजभाषांचा समान दर्जा देण्यात आल्याचे समजल्यावर अनेकांना आश्चर्याचा धक्का बसण्याची शक्यता आहे! नागालँडमध्ये मात्र तेथील वेगवेगळ्या जमातींच्या बोलभाषा पुरेशा विकसित झालेल्या नसल्याने इंग्रजी हीच राजभाषा ठरविणारा कायदा त्या राज्यात अमलात आहे. वस्तुस्थिती ही अशी आहे. ही सर्व पार्श्वभूमी ध्यानात घेता गोवा राज्यात कोकणी व मराठी या दोन्ही राजभाषा आहेत अशी स्पष्ट तरतूद १९८७ च्या राजभाषा कायद्यात करणे हेच न्याय्य झाले असते.

## इंग्रजी वृत्तपत्रांनी गोवा सरकारला दिलेला इशारा

गोव्यात कोकणीच्या बरोबरीनेच मराठीलाही राजभाषेचे स्थान देण्याच्या चळवळीच्या संदर्भातील इंग्रजी वृत्तपत्रांतून व्यक्त झालेला एकंदर जनमानसाचा समंजसपणाचा कानोसा जाणून घेणे कुतूहलजनक ठरेल. पणजीहून प्रसिद्ध होणाऱ्या 'The Navhind Times' या इंग्रजी दैनिकाच्या विद्वान संपादकांनी दि. २० मे २००० रोजीच्या अग्रलेखातून प्रस्तुत संदर्भात गोवा सरकारला दिलेला पुढील अत्यंत परखड असा इशारा संबंधितांनी मनन करण्यासारखाच आहे. "For effective change, there is absolutely no dispute about Konkani being the spoken language of an over whelming majority of Goans. At the same time, it is also true that Marathi is the language in which majority of Goans express themselves in writing. Membrs of a family communicate with each other through letters written was quite rich, besides being the literary language for a majority of Goans. Marathi has also continued to be the language of oral discourse in several Talukas of the state, especially in North Goa, which was geographically

and culturally closer to Maharashtra. There is also no dispute that ever since the official. language Act was passed not only the supporters of Marathi. but also the advocates of Konkani entertained the nation that while Konkani had been made the official Language. Marathi had been accorded an equal status to it. In fact had it not been for such an understanding. the supporters of Marathi would not have been quite and surely agitated for equal status all these years. just as they are doing day. after the new revelation reaching them through the interpretation of the Bombay High court in other words. Goans supporting either language were reconsidred to the deal of Marathi enjoying an equal status as konkani

As far as the official business was concerned the government remained in different to the implementation of the official language Act. The government of Francisco Sardinha must take. initiative to implement the legislation in letter and spiril or improve it without denying the legitimate interests of Marathi" गोव्यातील एकूण जनमानसाची नेमकी नाडी जाणणाऱ्या एका सुप्रतिष्ठित इंग्रजी दैनिकातील कमालीच्या जाणकारीन केलेले हे विचारमंथन ध्यानी घेऊन गोवा सरकारने मराठीला राजभाषेचे स्थान देण्याचे आपले कर्तव्य पार पाडण्यात कसूर केल्यास संबंधितांना त्याचे गंभीर परिणाम भोगावेच लागतील हा प्रस्तुत इशारा मुळीच दुर्लक्ष करण्यासारखा नाही. १९८७ च्या राजभाषा विधेयकाच्या बाबतीत आपण 'करायला गेलो एक आणि झाले भलतेच!' याचे भान गोवा सरकारला एव्हाना आलेच असावे.

मात्र, जून १९९९ मध्ये निवडून आलेल्या सध्याच्या गोवा विधानसभेने गेल्या दीड वर्षाच्या काळात आतापर्यंत पुढील तीन मुख्य मंत्री अधिकारावर आलेले पाहिले, ते म्हणजे १) Luiginho Faleiro, २) Francisco Sardinhaआणि आता ३) मनोहर पर्रीकर. यांपैकी कोणत्याही सरकारचे बूड पुरेसे स्थिर झाल्याशिवाय भाषेसारख्या अत्यंत संवेदनाशील प्रश्नासंबंधीची आपली नेमकी भूमिका मुख्य मंत्र्यांनी स्पष्ट करणे म्हणजे ती एक प्रकारे आपण होऊन स्वत:च्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे तर होणार नाही ना? अशीही जनसामान्यांची एक आशंका आहे.

दरम्यान अलीकडेच फोंडा गोवा येथील गोविंद पै रायतूरकर महाविद्यालयातील प्रा.प्रदीप म्हस्के यांनी पुण्याच्या नेहरू समाजशास्त्र अध्ययन केंद्रामार्फत संशोधन करून गोमंतकातील भाषेचे राजकारण, या विषयावर लिहिलेला प्रबंध पीएच. डी. पदवीसाठी स्वीकृत झाल्याचे समजते. प्रस्तुत संदर्भातील प्रा. डॉ. म्हस्के यांनी काढलेले निष्कर्ष कोणते आहेत, ते अभ्यासकांनी जाणून घ्यायला हरकत नाही.

## हिंदू व ख्रिस्ती समाजांतील सांस्कृतिक एकीकरणाची नितांत आवश्यकता

पोर्तुगीजांनी गोव्याला जी संस्कृती दिली तिचे अत्यंत खोचक व बोचक वर्णन 'पिग, पेग व पाद्री' असे सुभाव रामकृष्ण सामंत यांनी करून ठेवले आहे, त्याचे येथे स्मरण होते. गोव्यातील भाषिक राजकारणाला आणखीही एक महत्त्वाचा आयाम आहे. पोर्तुगीजांनी अनन्वित धर्मच्छळाचा वरवंटा फिरवूनही गोव्यातील हिंदूंनी आपली मराठी भाषा प्राणपणाने टिकवून ठेवली पण ज्यांना नाइलाजाने ख्रिस्ती धर्म स्वीकारावा लागला, त्यांना मात्र मूळ मराठी भाषेच्या प्रवाहापासून जबरदस्तीने परावृत्त करण्याच्या कामी पोर्तुगीज राज्यकर्ते बरेच यशस्वी झाले. तरीपण गोव्यातील हिंदू प्रमाणेच ख्रिस्तीजनांच्या पूर्वजांची ही सांस्कृतिक व्यवहाराची भाषा मराठीत होती. या दोन्ही समाजांचा मूळ वारसा एकच म्हणजे मराठीच होता. पण गोमंतकाच्या आधुनिक स्वातंत्र्य संग्रामाचे जनक डॉ. त्रिस्तांव ब्रागांझ कुन्हा या थोर विचारवंताने Denationalization of Goans (Bombay 1944) या अभ्यासपूर्ण पुस्तकात लिहिल्याप्रमाणे पोर्तुगीजांनी गोमंतकीयांचे केवळ धर्मांतरच केले असे नसून त्यांपैकी ख्रिस्तीधर्मीय बांधवांची हिंदुस्थानातील संस्कृतीपासून जास्तीत जास्त फारकत कशी होईल यासाठीही सर्व प्रकारची कारस्थाने केली. त्यांची मराठी व कोकणीशी असलेली नाळ ही मुळातच कशी तोडण्यात आली हे सौ. प्रफुल्ल गायतोंडे यांनी केलेल्या डॉ. कुन्हा च्या प्रस्तुत पुस्तकाच्या 'गोवेकरांच्या राष्ट्रीयत्वाचा ऱ्हास' या उत्कृष्ट अनुवादात वाचायला मिळेल. (प्रकाशक गोमंतक मराठी अकादमी, पणजी १९९१) अशा प्रकारे, गोव्यातील हिंदू व ख्रिस्ती बांधवामध्ये जी एक कृत्रिम दरी निर्माण झाली त्याचा परिणाम भाषेच्या राजकारणावरही झालेला आढळतो. गोवा मुक्तीनंतर हे दोन्ही समाज एकत्र येण्याची प्रक्रिया नेटाने सुरू झाली असती तर त्यांचे सांस्कृतिक एकीकरण केव्हाच यशस्वी झाले असते.

## रोमन लिपीची ख्रिस्ती धर्मप्रसाराशी घातलेली सांगड

गोव्यातील धर्मांतरित ख्रिस्ती बांधवांची पूर्वपरिचित मूळ मराठी व संस्कृत धर्मग्रंथांशी असलेली नाळ पूर्णपणे तोडून टाकण्याच्या उद्देशाने परदेशी मिशनऱ्यांनी सतराव्या शतकात लिहिलेल्या स्थानिक बोलीभाषेतील धार्मिक पुस्तके, कोश व व्याकरणे ही सर्व देवनागरी लिपीत न छापता ती जाणीवपूर्वकच रोमन लिपीत छापण्यात आली होती. फादर स्टीफन्सचे मराठी भाषेतील क्रिस्तपुराण रोमन लिपीतच मुद्रित झाले होते. देशी भाषांतील पुस्तकांसाठी रोमन लिपीचा वापर केल्यामुळे ख्रिस्ती धर्माच्या वाङ्मयाचा प्रसार व प्रचार सुलभ व्हावा हाही एक महत्त्वाचा हेतू होता. "Trade follows the flag, the Alphabet follows religion" या इंग्रजी सुभाषितातील मर्म सुज्ञांस सांगणे नलगे! परिणामतः, गोव्यातील ख्रिस्ती बांधवांना देवनागरी लिपीत छापलेली केवळ मराठीच नव्हे, तर कोकणीतील पुस्तकेदेखील परकी वाटू





अनुक्रमणिका

लागली, हा काळाने उगवलेला एक प्रकारचा सूडच म्हणायला हवा !

### आता ख्रिस्ती बांधवांची मराठीसाठी आग्रहाची मागणी

आता मात्र वारे उलट्या दिशेने वाहू लागलेले दिसतात. नवीन शैक्षणिक धोरणानुसार प्रत्येक विद्यार्थ्याला प्रादेशिक भाषा व राष्ट्रभाषा हिंदी यांचा अभ्यास करावाच लागतो आणि त्यासाठी देवनागरी लिपी आत्मसात करावी लागते. गोव्यातील कोकणीला राजभाषा ठरवताना तिची सांगड देवनागरी लिपीशी घालण्यात आली आहे, रोमन लिपीशी नव्हे. त्यामुळे देवनागरी लिपीच्या द्वारा ख्रिश्चनांना हिंदी, मराठी व कोकणी यांपैकी कोणतीही किंवा तीनही भाषा शिकण्याची चांगली सोय झाली आहे. पणजी येथील The Navhind Times या इंग्रजी दैनिकच्या दि. २१ मे २००० च्या अंकातील वाचकांचा पत्रव्यवहार या सदरात फेलिक्स पेरेरा या गोमंतकीय ख्रिस्ती गृहस्थाने अशी विनंती केली आहे की, गोव्यातील सर्व गिरिजागृहांतून (चर्च) म्हटल्या जाणाऱ्या कोकणीतील प्रार्थनांच्या आणि ख्रिस्ती धर्मविषयक उपदेशांच्या सगळ्या पुस्तिका या रोमन लिपीच्या जोडीनेच देवनागरी लिपीतदेखील छापणे आवश्यक आहे. आपापल्या घरी पोर्तुगीज किंवा इंग्रजी भाषांचा वापर करणाऱ्या गोवेकरांनी देवनागरी लिपीतील कोकणी व मराठी साहित्याचे वाचन करणे हे सांस्कृतिक देवाणघेवाणीच्या दृष्टीने अत्यंत लाभदायक आहे, असाही त्याचा आपल्या भाईबंदांना हितोपदेश आहे. तसेच The Navhind Times या दैनिकाच्या दि. २२ मे २००० च्या अंकातील 'What's wrong with Marathi?' या शीर्षकाच्या एका लेखात श्री. अँथनी डिसिल्वा नावाच्या एका सुजाण गोवेकराने मराठी भाषेसंबंधी व्यक्त केलेली स्वागतार्ह भूमिका त्यांच्याच शब्दांत येथे देतो:-

"The Important point which I have to raise within article is that, what harm Marathi is going to do Christians if the Government accepts Marathi along with Konkani? I say this as Marathi and Konkani in Devanagari script are similar and familiar to us. In future we should send our children to English schools where Marathi subject is taught to them with compulsion because I have often observed that the Konkani writers are able to write in the language in Devanagari script, only after haing learnt marathi at primary school level. Also the literature in Marathi is richer as compared to that in Konkani."

सतराव्या शतकात 'क्रिस्तपुराणा'सारखी मराठीतून अभिजात काव्यनिर्मिती करणाऱ्या फादर स्टीफन्सचा अभिमानास्पद वारसा सांगणारे श्री. अँन्थनी डिसिल्वा व फेलिक्स पेरैरा यांच्या सारखे आताच्या नव्या पिढीतील ख्रिस्ती बांधव गोव्यातील इंग्रजी वृत्तपत्रांतून आग्रहपूर्वक अशी मागणी करू लागले आहेत की, सर्व ख्रिश्चनांनी आपल्या मुलांना ज्या इंग्रजी शाळांमधून मराठी हा आवश्यक विषय म्हणून शिकविला जातो त्याच शाळांमध्ये पाठवावे. याचे मुख्य कारण असे

की, प्रामाणिकपणे कोकणीशी तुलना करता मराठी वाङ्मय हे सर्वांगांनी अत्यंत समृद्ध झालेले असल्यामुळे मराठी भाषेच्या अभ्यासाने आपली कोकणीविषयक वाङ्मयीन आकलनाची जाण ही सखोल व अत्यंत विशाल होईल. देवनागरी लिपीतून कोकणी साहित्यनिर्मिती करणाऱ्यांचे बहुतेकांचे प्राथमिक शिक्षण हे मराठीतूनच झालेले आहे हे विसरता कामा नये. एकंदरीत देवनागरी लिपीतून कोकणी व मराठी भाषा शिकण्यामुळे ख्रिस्ती लोकांचा लाभच होणार आहे. यासाठीच गोवा सरकारने कोकणीच्या जोडीनेच मराठीलाही राजभाषेचे सन्मानाचे स्थान दिल्यास ख्रिस्ती जनतेचे काहीही नुकसान होणार नाही. अशी ही गोमंतकीय ख्रिस्ती बांधवांचीदेखील मराठीविषयीची अत्यंत समंजस भूमिका आहे, हे ध्यानी घेऊन गोवा सरकारने आपण होऊन मराठीवर १९८७ साली कळत नकळत झालेला अन्याय दूर करण्यासाठी पुढाकार घ्यायला हवा.

*(महाबँक पुरस्कार २००० च्या वितरण समारंभाचे प्रमुख पाहुणे म्हणून दिलेले व्याख्यान.)*

***

डी, १५ श्री शंकर नगरी, पौड रोड, कोथरुड पुणे ४११०२९



अनुक्रमणिका

# मातृभाषा, परभाषा

**विलास सारंग**

(इंग्रजीवरून अनुवाद : विजया देव)

'मातृभाषा'ही जरा मजेशीरच कल्पना आता झपाट्यानं कालबाह्य आणि अप्रस्तुत बनत चाललेली आहे. आपलं आयुष्य आता कुठल्यातरी एकाच, पवित्रतम अशा भाषेशी निगडित झालेलं नसतं. तसं ते होतं तरी केव्हा म्हणा! भारतात शहरातच्या आणि खेड्यापाड्यातल्या अगदी लहानलहान मुलांचासुद्धा दोन, तीन (किंवा प्रसंगी अधिकही) भाषांमधून लीलया, संचार चाललेला असतो. दोन वेगवेगळ्या 'मातृभाषा' असणाऱ्या आईवडिलांच्या मुलांची संख्याही आता वाढत राहणार यात काही शंका नाही. आजच्या परिस्थितीत, आयुष्यातल्या वेगवेगळ्या वळणांवर वेगवेगळ्या भाषेचा आपल्या पगडा असेल. वाढता परदेश प्रवास आणि वाढते परदेशातील वास्तव्य यांचा आपल्या भाषा जाणिवेवर अपरिहार्यपणे परिणाम होत असतो. आपली तथाकथित 'मातृभाषा' म्हणजे मनाच्या तळाशी पुसट होत जाणारी आठवण किंवा आपल्या मनात वसतीला असलेल्या अनेक भाषांमधली एक एवढेच तिचे स्थान असेल तर मग 'पवित्र' मातृभाषेबद्दल बोलण्यात काय अर्थ आहे?

मातृभाषेचा एवढा उदोउदो होण्याचे कारण म्हणजे केंद्राचे सनातनशास्त्र. 'केंद्र' ही कल्पना लोकांना (बहुतेक वेळा अधिकार स्थानातील लोकांना) पूर्वापार उपयुक्त वाटत आलेली आहे. त्यातून त्यांचे अनेक हेतू साध्य होतात: प्रत्येक गोष्टीला एक केंद्र असतं, आतला कोण, बाहेरचा कोण, उच्चस्थानी (केंद्रस्थानी किंवा त्यालगत) कोण आणि तळाशी कोण हे त्यावरून ठरतं. उतरंड आणि बहिष्कृती ठरवणं त्यामुळे सोपं जातं. या दोन कल्पना सर्वच समाजांमध्ये शक्तिशाली (आणि मारक) अस्त्र म्हणून जोपासल्या गेल्या आहेत.

एक उदाहरण देतो : मराठी भाषक, मराठी हे जीवापाड जपायचं केंद्र म्हणून तिच्याकडे पाहतात तेव्हा दुसऱ्या भाषेविरुद्ध (उदाहरणार्थ, इंग्रजी विरुद्ध) दंड थोपटतात कारण तिचे मराठीच्या क्षेत्रावर आक्रमण होत आहे असे त्यांना वाटते.

पुरेसे मराठीपण न दाखवल्यावरून एखाद्या मराठी लेखकावर कोरडे ओढले जाऊ शकतात. मीच त्याचे लक्ष्य बनलेलो आहे. एक मराठी समीक्षक आणि प्राध्यापक (इंग्रजीचे, बरे का!) चंद्रशेखर जहागिरदार यांनी जाहीर केलं: ''विलास सारंगांनी त्यांची आधुनिकता इतकी गृहीत धरलेली आहे की त्यांचे देशीपण संपुष्टात आले आहे'' मला केंद्रबहिष्कृत करण्याची ही जहागिरदारांची रीत म्हणजे, जवळजवळ शंभर वर्षांपूर्वीपर्यंत महाराष्ट्रीय समाजात प्रचलित असलेल्या, वाळीत टाकण्याच्या दुष्ट प्रथेचा सौम्य प्रकारच म्हणायला हवा.





अनुक्रमणिका

जे इंग्रजीला केंद्र मानतात तेही तिचं श्रेष्ठत्व टिकवण्याबाबत तितक्याचं उत्साहानं इंग्रजीची तळी उचलून धरतात. हे मुंबईतले ('बॉम्बे' म्हणणं या ठिकाणी अधिक शोभेल) आणि इतर शहरांमधले इंग्रजीवाले भारतीय भाषांकडे उदार आश्रयदात्याच्या भूमिकेतून पाहतात. 'व्हर्नाक्युलर' ही एक विचित्र उपाधी या भाषांना त्यांनी दिलेली आहे. 'घरात जन्माला आलेला गुलाम' या अर्थाचा Verna हा शब्दरोमन लोक वापरत असत, त्यापासून हा शब्द सिद्ध झाला अशी खरं तर या शब्दाची व्युत्पत्ती शब्दकोशात दिलेली आहे. कधीकधी व्युत्पत्ती किती अर्थपूर्ण असू शकत याचं हे चांगलं उदाहरण आहे.

मुंबईत काही वर्षांपूर्वी एका ब्रिटिश कौन्सिल पुरस्कृत परिषदेत एक प्रश्न उपस्थित झाला होता: इंग्रजी साहित्य भारतीयांनी आपापल्या भाषांमधून अभ्यासावं का, हा तो प्रश्न. कवी अँटनी थ्वेट यांनी आवेशानं युक्तिवाद करुन या कल्पनेला विरोध केला. ते म्हणाले "कृपा करून असं काही करु नका. जे तुमच्याकडे चांगलं चालून आलंय त्याचा असा अव्हेर करु नका." पण त्याबरोबरच अशीही सौम्य समज दिली जाते की, इंग्रजीबाबत स्वातंत्र्य घेण्याची भारतीयांना मुभा नाही, या भाषेवर आपलं प्रभुत्व आहे असं त्यांनी मानू नये. 'सदोष इंग्रजी' लिहिल्याबद्दल अरूण कोलटकर आणि जयंत महापात्र यांच्यावर ठपका ठेवला जातो. म्हणजे हा दुहेरी पवित्रा आहे. आमची भाषा शिका (तिला सोडचिठ्ठी देऊ नका!) पण तिला आपलीच मालमत्ता समजून वागाल तर याद राखा. एकंदरीत काय, 'स्वगृही जन्मलेला गुणी गुलाम' बना.

जुने इंग्रजीवाले आता पहिल्याप्रमाणे फाजील अहंविश्वास आणि स्वयंतुष्टता बाळगू शकत नाहीत. मुंबई विद्यापीठातील इंग्रजीचे माजी प्राध्यापक रा. भा. पाटणकर एक मजेशीर किस्सा सांगतात. खास संस्कृत- मराठी पठडीत तयार झालेले पाटणकर नाशिकहून १९६५ च्या सुमारास मुंबईत आले. त्यांनी आपलं स्वतंत्र ठसा उमटवणारं विद्वत्तापूर्ण लेखन बहुतांशी मराठीत केलेलं आहे. १९८५ मध्ये निवृत्त होताना ते मला म्हणाले "या शहरातल्या माझ्या वीस वर्षांच्या वास्तव्यात मला जाणवलेला एकमेव बदल म्हणजे - तेव्हा मला लोक विचारत, 'तुम्ही मराठीत लिहिता?' सूर असे तुच्छतेचा, मोठ्याने लहानाला सांभाळून घेण्याचा. आता ते म्हणतात, 'तुम्ही मराठीत लिहिता?' सूर असतो कौतुकादराचा !"

हा लेख इथवर वाचल्यावर काहीजण आता अधीरपणे विचारतील : तुमची बाजू कोणती ? तुम्ही इंग्रजीचे पुरस्कर्ते की देशीवाद्यांचे ? माझं उत्तर असं : मी कोणत्याच बाजूचा नाही; मी मध्य विस्थापित आहे, दोन आघाड्यांच्या मधला हा धोक्याचा प्रदेश आहे कबूल - पण आपलं स्वातंत्र्य आणि स्वत्व अबाधित राखायची आकांक्षा आपण या पट्ट्यातच बाळगू शकतो. ज्याला म्हणून आपलं स्वातंत्र्य आणि स्वत्व आज राखायचंय त्याला सर्व प्रकारच्या बहिष्कृतीशी दोन हात करायलाच पाहिजेत. खडतर जिणं आहे या बहिष्कृतमध्यातलं.

***





अनुक्रमणिका

मी आधी म्हटल्याप्रमाणे 'मातृभाषा' हे रहस्यमय प्रकरण केंद्राच्या हव्यासातून, कशाला तरी घट्ट चिकटून राहण्याच्या तीव्र इच्छेपोटी निर्माण होतं. त्यात 'सत्त्वा' वर असलेला गाढ (पण निराधार) विश्वासही दिसून येतो. आपली भाषा ही आपल्या अपरिवर्तनीय सत्त्वाचाच एक भाग आहे, ही कल्पना तशी दोन्हीकडून उपयोगी पडते. राष्ट्रीय प्रांतीय भावना गोंजारायला तिचा उपयोग होतो. (जर्मनीच्या राष्ट्रगीताच्या चालीवर, सर्वप्रथम माझी भाषा आपली म्हटलं म्हणजे झालं!) तसंच दुसऱ्याला आपली जागा दाखवून देण्याच्या कामीही ही कल्पना उपयोगी पडू शकते.

बी. राजन् हे आधीच्या पिढीतले एक इंग्रजी साहित्याचे अभ्यासू विद्वान. टी. एस. एलियट आणि मिल्टनवर त्यांची लक्षणीय पुस्तकं आहेत. तसंच त्यांची आणखीही पुष्कळ पुस्तकं आहेत. भाषा आणि साहित्य या त्यांच्या व्यासंगविषयात त्यांच्याएवढा अधिकार असलेला दुसरा माणूस मिळणं दुरापास्त. त्यांच्या एलियटवरील पुस्तकाचं 'स्क्रूटिनी' नियतकालिक ात परीक्षण करताना एफ्. आर्. लीव्हिस राजनना बजावतात, की राजन भारतीय असल्यामुळे ते एलियटच्या काव्यातील तरल, शब्दातीत अशा गाभ्याला हात घालू शकणार नाहीत. आपल्या श्रेष्ठत्वाचं स्थान ज्यांना जपायचंय त्यांना ही अव्याख्येय सत्त्वाची कल्पना चांगली कामाला येते. युक्तिवाद तिथे थांबतोच.

मी बसरा विद्यापीठात शिकवत असताना एकदा अँटनी थ्वेट आणि त्यांच्या पत्नी ॲन (त्याही एक लेखिका - चरित्रकार आहेत) हे तिथे आले होते. त्यांच्याशी बोलताना जेव्हा मी मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांत लिहीत असल्याचा उल्लेख केला तेव्हा ॲन मला म्हणाल्या ''तुम्हाला स्वप्न कोणत्या भाषेत पडतात?'' ज्या भाषेत तुम्हाला स्वप्न पडतात तीच तुमची 'खरी' भाषा हाच अर्थात त्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय होता. आणि 'मराठी' हे उत्तर त्यांना अपेक्षित होतं; हे उघड आहे. म्हणजे इंग्रजी भाषेतला लेखक असल्याचं माझं सोंग उघडकीला आणणं .... आता खरा मुद्दा असा आहे की माणसाला मुळी कुठल्या 'भाषेत' स्वप्न पडतच नाहीत. (स्वप्न हीच एक भाषा असते.) स्वप्न मूलतः दृश्यमान होतात. स्वप्नात काही बोलणं ऐकू आलंच तर ते माझ्या बाबतीत बोलायचं झालं तर, स्वप्नातले संदर्भ आणि व्यक्तिरेखा यांच्या आनुषंगानं मराठीत असेल किंवा इंग्रजीत असेल. म्हणजे त्यावरून काहीच सिद्ध होत नाही. आणि जरी अगदी मला स्वप्न 'मराठी' त पडलं तरी *त्यावरून* काय सिद्ध होतं? फारतर त्यावरून एवढंच सिद्ध होईल की माझं अबोध मन मराठीशी जोडलेलं आहे. काही लोक या अबोध मनाला लेखनाचा चैतन्य स्रोत मानतात. हे फार झालं तर अर्धसत्य आहे. पण या अबोध मनाच्याद्वारे अशा लेखकांना वांशिक सत्त्वाशी जखडून ठेवता येतं, निदान तसं समजलं जातं. 'वांशिक स्मृतिसंचित' आणि तत्सम प्रकाराचं गाठोडं या अबोध मनाबरोबर येतं आणि ते पद्धतशीर जखडून ठेवतं. तुम्ही बाहेरच्या अंधारपोकळीन जाऊन पडता !

ज्यांना तुम्हाला *आत* ठेवायचं असतं तेही नेमक्या याच डावपेचांचा आश्रय घेतात. तू भारतीय आहेस, तुझी मातृभाषा मराठी आहे, त्या हानिकारक पाश्चात्त्य कल्पना, आणि प्रभाव यांना बळी पडू नको बरं. मुळात इंग्रजीत लिहूच नकोस. आपण सारे या केंद्रस्थानी आहोत. प्रकाशवलयात आहोत. आपण लढवलेल्या या किल्ल्याभोवतालच्या अंधाराचं भान असू दे. चल ये, मातृभूमी, मातृभाषा याचं आपल्याला संरक्षण करायचं, वगैरे वगैरे

अरूण कोलटकर यांनी आपला 'जेजुरी' हा कविता संग्रह इंग्रजीत लिहिला या पापाबद्दल भालचंद्र नेमाडे आदी ख्यातनाम साहित्यिकांनी त्यांना चांगलंच धारेवर धरलं. पाश्चात्त्य खपासाठी योजली गेलेली एक सस्ती युक्ती म्हणून 'जेजुरी ' ची वासलात लावली गेली.

भारतीयांनी इंग्रजीत लिहावं का किंवा ते लिहू शकतात का या प्रश्नाची मोठ्या हिरिरीनं चर्चा केली जाई. तो प्रश्नच मोठ्या बिनतोड पणे निकालात काढला गेलाय. प्रत्यक्ष कृती आणि त्याचे परिणाम यांच्याद्वारे गेल्या काही दशकांमध्ये भारतीय साहित्यिकांनी जे गद्य आणि काव्य निर्माण केलं त्यानंच दोन्ही प्रकारच्या बहिष्कृतिवाद्यांना या प्रश्नाचं उत्तर परस्पर मिळून गेलंय.

गंमत म्हणजे या दोन विरुद्ध थरातल्या या बहिष्कृतिवाद्यांची भाषा मात्र अगदी एकच असते. '' इंग्रजीत उगीच उचापत्या करू नका. ती तुमची भाषा नव्हे;'' असं लीव्हीस आणि त्यांच्यासारखे बजावतात तर, नेमाडे आणि त्यांचे देशीवादी मित्र नेमकी तीच घोषणा देतात.

कल्पना करा, जर हे भाषिक अविचारी प्रेम असंच वाढत गेलं (कदाचित तसं होईलही) तर उद्याच्या एखाद्या कोल्हटकरवर आपली ' जेजुरी' छापण्याची बंदी घातली जाईल. मग तिचा हस्ते परहस्ते भूमिगत प्रवास होईल. पुढे कदाचित ती चोरून बाहेर पाठवली जाईल आणि न जाणो तिला, कॉमनवेल्थ किंवा एखादेवेळी नोबेल पारितोषिक सुद्धा मिळेल. मग तो कवी पेचात सापडेल. परतीची वाट बंद झाल्यावरही पारितोषिक स्वीकारायला म्हणून परदेशी जायला निघावं की, आपल्या मातृभाषेच्याच अंगणात राहण्यासाठी पारितोषिक नाकारावं ?

***इतिवचन***

प्रा.डॉ. विलास सारंग यांनी मुंबईहून निघणाऱ्या '*न्यू क्वेस्ट*' नियकालिकात 'एक्स्क्लूडेड मिडल' (वर्जित मध्य) नावाचा स्तंभ चालू केला आहे. जाने. - मार्च२००० च्या अंकातून हा लेख अनुमतिपूर्वक अनुवादित केला आहे.

***

मूळ लेखकाचा पत्ता : १५-८व्हाइसरॉय पार्क, बी टॉवर, समता नगर, कांदिवली (पू.) मुंबई ४००१०१
अनुवादकाचा पत्ता : ९ प्रिया, ९ वरळी सी फेस, मुंबई ४०० ०२५

[*संपादकीय आवाहन* : लेखाच्या सुरुवातीला 'मातृभाषा' ही कल्पना प्रश्नांकित केली आहे तर अखेरीला वाङ्मयीन देशीवादाची कल्पना प्रकाशित केली आहे. वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया अवश्य लिहून पाठवाव्या. निवडक प्रतिक्रिया प्रकाशित करता येतील. तसे पाहिले तर भाषेच्या जागतिकीकरणाशी हा सगळा विषय संबंधित आहे.]





अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# 'वृद्धिः..' - भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन

म.अ. मेहेंदळे

(लेखक: दिनेश द. माहुलकर; प्रकाशक : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. पृष्ठे : एकवीस + १४०, मूल्य : १६० रुपये)

डॉ. माहुलकरांचे प्रस्तुत पुस्तक ज्या संस्थेने प्रसिद्ध केले आहे त्या संस्थेला ''भाषाविषयक विविध प्रश्नांच्या संदर्भात जिज्ञासू वाचकांची जाण अनेक अंगांनी वाढविणे'' हे एक महत्त्वाचे कार्य वाटते असे संस्थेच्या संचालिका डॉ. सरोजिनी वैद्य यांनी त्यांच्या 'निवेदना'च्या प्रारंभी सांगितले आहे. हे कार्य पार पाडण्याच्या हेतूने संस्थेने यंदा पाच पुस्तके प्रसिद्ध करण्याचे ठरविले आहे. त्यांत माहुलकरांचे पुस्तक तिसऱ्या क्रमांकावर आहे. संस्थेचा हा उपक्रम स्तुत्य आहे असेच कोणीही म्हणेल.

ग्रंथाची 'ओळख' डॉ. अशोक केळकरांनी करून दिली आहे. ते म्हणतात की माहुलकरांचा साहित्य , तत्त्वज्ञान, गणित, भाषा अशा विविध विषयांचा अभ्यास होता. ह्या सर्व क्षेत्रात नित्य नवी क्षितिजे धुंडाळण्याचे काम ते करीत असत, त्यांचे हे काम म्हणजे ''एका जिवंत बुद्धिमत्तेचे विकसन होते'' (पृ. आठ अ). माहुलकरांशी ज्यांचा परिचय झाला होता त्यांना डॉ. केळकरांचे म्हणणे सहज पटेल.[१]

डॉ. केळकरांच्या 'ओळखी'नंतर माहुलकरांचे 'मनोगत' आहे. माहुलकर १९३९ साली मॅट्रिक झाले व त्यांनी बडोदा कॉलेजात प्रवेश घेतला. तिथपासून बडोद्याजवळ असलेल्या गरुडेश्वर ह्या तीर्थक्षेत्री प्रस्तुत पुस्तकाचे पहिले प्रकरण लिहून होईपर्यंतच्या सुमारे साठ वर्षांच्या कालखंडात माहुलकरांनी केलेल्या बौद्धिक प्रवासाचे धावते वर्णन 'मनोगता' त आढळते, ते वाचनीय आहे. साहित्य हा त्यांचा खरा अभ्यासविषय. विज्ञान विषयाची त्यांना पहिल्यापासूनच आवड होती. बडोद्यास डॉ. श्री. स. भावे यांच्याशी त्यांच्या संस्कृत व्याकरणविषयक चर्चा होत. त्यांतूनच ते गणिती शास्त्रातील उच्च स्तरावरील अभ्यासाकडे वळले. पुढे डेक्कन कॉलेजात होणाऱ्या भाषाशास्त्रीय शिबिरास उपस्थित राहण्याच्या निमित्ताने ते भाषाशास्त्राकडे आकृष्ट झाले, आणि मग त्यात रमून गेले. ह्या विषयावरच त्यांनी पुढे व्याखानमाला गुंफल्या, ग्रंथरचना केली. बडोदा कॉलेजातील त्यांचे इंग्रजी विभागातले स्थान-त्यांना ओल्ड इंग्लिशचे भरपूर ज्ञान असूनही -डळमळीत करण्यात आले. ती मानहानी मानून माहुलकरांनी तो विभाग सोडला आणि नव्यानेच सुरू झालेल्या भाषाविज्ञानाची धुरा स्वीकारली, आणि त्यांनी ती समर्थपणे संभाळली. इंग्रजी विभाग सोडावा लागल्यामुळे माहुलकरांच्या मनाला अतिशय क्लेश झाले

असतील ह्यात संशय नाही. पण भाषाविज्ञानाच्या दृष्टीने ती इष्टापत्ती होती. बडोदा विद्यापीठात माहुलकरांच्या नेतृत्वाखाली भाषाविज्ञानाला जी प्रतिष्ठा लाभली त्यासाठी त्यांना आधी झालेले क्लेश ही एक तपश्चर्याच ठरली.

नोकरीतून निवृत्त झाल्यावर माहुलकरांना शिमला येथील 'भारतीय उच्च अध्ययन संस्थान' या संस्थेत तीन वर्षे (१९८९-९२) फेलोशिप मिळाली. शिमल्यास त्यांना वाचन लेखनास पोषक वातावरण लाभले. त्याचा त्यांनी पुरेपूर उपयोग करुन घेतला. तिथे केलेल्या संशोधनाचे फलस्वरुप म्हणजे 'Methodology of Socio-Historical Linguistics 'हे त्यांचे पुस्तक (१९९६). '' 'भाषा' व 'भाषाविज्ञान' या विषयांच्या एकोणिसाव्या शतकातील अभ्यासातील उणीवांचा त्यात सविस्तर विचार केला असून ''सोस्यूरच्या विचारांना नव्यानं समजल्याशिवाय भाषाविज्ञान पुढे पाऊल टाकू शकणार नाही हे स्पष्ट केलं आहे.'' (पृष्ठ १२)

सोस्यूरच्या विचारांचे भाषाविज्ञानात असणारे महत्त्व मराठी वाचकांना समजावून सांगण्यासाठीच जणू माहुलकरांनी प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे. तो लिहिण्याची प्रेरणा त्यांना त्यांच्या सुविद्य पत्नी अलकाताईंनी दिली. भाषाविज्ञानाविषयीची माहुलकरांची भूमिका 'सोप्या पद्धतीनं मांडावी' असा त्यांना अलकाताईंचा आग्रह होता. मराठी वाचक अलाकाताईंचे याबद्दल ऋणी राहतील.

माहुलकरांची सुरुवातीची आठ पानी प्रस्तावना महत्त्वाची आहे. प्रस्तावनेत त्यांनी पुस्तकाच्या 'वृद्धिः..' ह्या वैशिष्ट्यपूर्ण नावाचा खुलासा केला आहे. तो करताना ग्रंथातला मुख्य मुद्दा स्पष्ट केला आहे. पाश्चात्त्य अभ्यासकांनी भाषांच्याकडे एक अभ्यासविषय म्हणून पाहण्यास सुरुवात केल्यावर त्यांना प्रथम प्रश्न पडला तो हा की मानवांच्या इथून तिथून साऱ्या भाषा निराळ्या का, एकच का नाही? पुढे, इराण व भारत येथील प्राचीन भाषांशी परिचय झाल्यावर त्यांना उलट प्रश्न पडला की ह्या भाषा युरोपीय भाषांपासून इतक्या दूर असूनही त्यांच्यांत व युरोपीय भाषांत साम्यस्थळे कां? ह्या प्रश्नाचा विचार करताना भाषांच्या तौलनिक आणि ऐतिहासिक अभ्यासास युरोप येथे (माहुलकरांचे सर्वत्र लेखन 'युरप' असे आहे) सुमारे दोनशे वर्षांपूर्वी सुरुवात झाली. आपल्याकडील विद्वानांना ह्या नव्या अभ्यासामुळे भाषेच्या तत्त्वज्ञानात एक महत्त्वाचे परिवर्तन घडून येईल याची जाणीव पूर्वी कधी झाली नाही, व अजूनही होत नाही. ती करून देणे हा हे पुस्तक लिहिण्याचा माहुलकरांचा 'प्रांजल उद्देश' आहे. (पृ.१५)

हे महत्त्वाचे परिवर्तन कोणत्या प्रकारचे ते सांगण्यापूर्वी, किंवा त्याला प्रस्तावना म्हणून, माहुलकरांनी पुस्तकाला जे नाव दिले आहे त्याचे कारण ते सांगतात. भाषेला एके काळी ती स्थिर असल्याचे मानून तिच्या अभ्यासाला ध्वनिशास्त्र, व्याकरणशास्त्र अशी कुंपणे घालण्यात आली. परंतु फर्दिनांद द सोस्यूर (Ferdinand de Saussure) याने भाषा ही एक

स्थिती नसून गती असल्यामुळे ती एक प्रतीक व्यवस्था असल्याचे मानले. या प्रतीकव्यवस्थेची पेटी बंद नसून उघडी आहे. माणसाचा मेंदू निर्मितिक्षम असल्याने या पेटीतून नवनव्या वाक्यरचना सहजपणे बाहेर पडतात आणि ती ती भाषा बोलणाऱ्यांना त्या तितक्याच सहजपणे समजतात. भाषेत प्रत्यही नव्याने निर्माण होणाऱ्या रचना (constructions) आणि त्यांची रचनांतरे (transformations) हा जो विकास आहे, त्यात जी तत्त्वे आहेत, त्यांचा अभ्यास व्हायला हवा, नुसत्या ध्वनींचा, शब्दांचा नको, असे सोस्यूरचे प्रतिपादन होते.

माहुलकरांच्या मते अष्टाध्यायीच्या प्रारंभी 'वृद्धि:' हा शब्द योजून पाणिनीला नेमके हेच सुचवायचे होते. भाषेचा अभ्यास म्हणजे वृद्धि, वाढ, विकास ही जी भाषेची मूळ प्रकृती तिचा अभ्यास हे सोस्यूरच्याही पूर्वी कैक शतके भारतीय वैयाकरणांनी ओळखले होते. सूत्रारंभीचा 'वृद्धि:' हा शब्द माहुलकरांच्या मते समृद्धिवाचक नाही, मंगलार्थी नाही, शिष्यांना आशीर्वादपर ही नाही, तर विकसनशीलता हे जे भाषेचे अंतरंग त्याचा सूचक तो शब्द आहे. म्हणून माहुलकरांनी तो शब्द त्यांच्या ग्रंथाचे नाम म्हणून निश्चित केला. 'वृद्धि:' हा एक 'शब्द नसून एक मंत्र आहे' असे माहुलकरांना वाटते. (पृष्ठ सतरा)

माहुलकरांचे हे विवेचन मला पटत नाही. 'वृद्धि:' ह्या शब्दाने पाणिनीला जे सुचवायचे आहे असे माहुलकरांनी म्हटले आहे तो त्यांच्या प्रज्ञेचा आविष्कार आहे. सोस्यूरच्या विचारांमुळे तो त्यांना सुचला आहे. पाणिनीला तसे काही सुचवायचे होते असे मला वाटत नाही. ग्रंथारंभी मंगलसूचक शब्द योजण्याची परंपरा भारतात केव्हा सुरू झाली कल्पना नाही पण "मङ्गलादीनि मङ्गमध्यानि मङ्गलान्तानि शास्त्राणि प्रथन्ते" ह्या महाभाष्यातील वाक्यावरून पाणिनीच्या काली ती अस्तित्वात होती असे गृहीत धरण्यास हरकत नाही. मङ्गलसूचक 'ओम्' आणि 'अथ' हे दोन शब्द प्रसिद्ध आहेत. "ओंकारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मण: पुरा / कण्ठं भित्त्वा विनिर्यातौ तेन माङ्गलिकावुभौ ।।" हा एक पारंपरिक श्लोक प्रसिद्ध आहे. काही कारणांमुळे पाणिनीला त्या शब्दांपैकी एकही वापरायचा नसला (पहिल्या सूत्राची अक्षरसंख्या वाढू नये म्हणून?) आणि अष्टाध्यायीसाठी जेवढी शब्दसामग्री त्याला उपलब्ध होती त्यांतला 'वृद्धि' हा शब्द मंगलासाठी योग्य वाटून त्याने तो निवडला असे म्हणण्यात काही वावगे दिसत नाही. 'वृद्धि' शब्दाचा अर्थ, वाढ, विकास, भरभराट असा असल्याने तो मंगलासाठी योग्य आहे. अष्टाद्धायीतील 'गुण' या संज्ञेचा अर्थ सांगणारे दुसरे सूत्र प्रारंभी घेऊन पाणिनीला ग्रंथारंभ करता आला असता, आणि सामान्यत: गुणवृद्धि असा क्रम असल्याने आधी गुण संज्ञा आणि मग वृद्धि संज्ञा सांगणारे सूत्र, असा क्रम योग्यही झाला असता. परंतु तसे न करता पाणिनीने 'वृद्धि' शब्दाने ग्रंथास प्रारंभ केला तेव्हा त्यात त्याचा काही हेतू होता हे निश्चित. तो हेतू मंगलवाचक शब्द ग्रंथारभी असावा हे भाष्यकारांचे म्हणणे सहज समजण्यासारखे आहे. त्याऐवजी वृद्धि

शब्दाने पाणिनीला मंगल वगैरे काही साधायचे नसून भाषा ही एक कुंठित व्यवस्था नाही ती एक विकसनशील संस्था आहे, ती नव्या, नव्या रचना निर्माण करून आपला विकास साधत असते असे त्याला सुचवायचे होते असे म्हणणे, म्हणजे माहुलकरांना स्वत:लाच कल्पना असल्याप्रमाणे, ते निश्चितच 'धाडस' (पृ.सतरा) आहे.

✻✻✻

माहुलकरांच्या मुख्य ग्रंथाचे दोन भाग आहेत: बहिरंग आणि अंतरंग. पहिल्या भागाची सात आणि दुसऱ्या भागाची पाच प्रकरणे आहेत (माहुलकरांनी स्वत: 'प्रकरण' हा शब्द वापरला नाही. सोयीसाठी मी तो वापरीत आहे). काही प्रकरणांना 'सोनियाचा दिवस', चक्र - नेमि-क्रम, 'शिष्यादिच्छेत् पराजयम्', 'गुरु- शुक्र-युती' अशी मोठी कल्पक नावे त्यांनी दिली आहेत. पहिल्या 'बहिरंग' ह्या विभागात पाश्चात्त्य विद्वानांची संस्कृत भाषेशी ओळख झाल्यावर युरोपात तौलनिक आणि ऐतिहासिक भाषाशास्त्रास आरंभ कसा झाला ते पहिल्या प्रकरणात सांगून नंतर पुढील प्रकरणांत ह्या नव्या अभ्यासाची क्रमाक्रमाने कशी प्रगती होत गेली ते उदाहरणांच्या साहाय्याने त्यांनी स्पष्ट केले आहे आहे. भाषाशास्त्राच्या ह्या नवीन पद्धतीचा प्रारंभ विल्यम जोन्स ( Jones, माहुलकर लेखन 'जोन्झ') या भाषापंडिताने २ फेब्रुवारी १७८६ रोजी दिलेल्या प्रसिद्ध व्याख्यानाने झाला म्हणून माहुलकरांनी त्या दिवसाला 'सोनियाचा दिवस' असे संबोधून त्याचा यथार्थ गौरव केला आहे. त्या भाषणात जोन्सने प्रथमच अशी उपपत्ती मांडली की संस्कृत, प्राचीन इराणी, ग्रीक, लॅटिन इत्यादी पौर्वात्य आणि पाश्चात्त्य भाषा पूर्वकाळी अस्तित्वात असलेल्या, पण आता तिचे पुरावे उपलब्ध नसलेल्या, कोणत्यातरी एका भाषेपासून उगम पावल्या असल्या पाहिजेत. माहुलकरांच्या म्हणण्याप्रमाणे जोन्सच्या ह्या उपपत्तीला चार्ल्स पर्स (Charles S. Peirce) या तर्कज्ञाच्या मते 'औतिह्य अनुमान' (abduction ) म्हणता येईल (पृ.७).

दुसऱ्या प्रकरणात तौलनिक भाषाशास्त्राधारे ध्वनिपरिवर्तनाचे नियम (Phonetic Laws ) मांडण्यास सुरुवात झाली ह्याचे विवेचन माहुलकरांनी केले आहे. पहिला असा मान्यता पावलेला नियम Gnrimm's Law म्हणून ओळखला जातो. या नियमाप्रमाणे काही भाषात घडून आलेले ध्वनिपरिवर्तन एका विशिष्ट गतीने घडून आल्याचे आढळते. ह्या गतीला ग्रिमने (Grimm) Kreislauf म्हटले. माहुलकरांनी त्यासाठी 'चक्र-नेमि-क्रम' हा शब्द योजून दुसऱ्या प्रकरणाला ते नाव दिले. त्यात वावगे काही नाही, नावात आकर्षताही आहे. पण त्यामुळे एक गैरसमज निर्माण होण्याची शक्यता आहे. 'चक्र-नेमि-क्रम' म्हटले की चाकाची सतत फिरत राहणारी गती डोळ्यांसमोर उभी राहते. परंतु जर्मॅनिक भाषाकुलातील ज्या ध्वनिपरिवर्तनाला (p >ph > b > p) उद्देशून हा शब्द योजिला आहे त्या भाषांत हे ध्वनि

परिवर्तन सतत घडत राहिले असे झाले नाही. चाकाचे एक वर्तुळ पूर्ण होताच ते तिथे थांबले (पृ.१२) , (पुन्हा शेवटच्या p चा ph. ph चा b असे होत राहिले नाही.) म्हणून Kreislauf ह्या अर्थी 'वर्तुळ गती' म्हणणे इष्ट वाटते.

दुसऱ्याही एक दृष्टीने माहुलकरांनी प्रस्तुत प्रकरणाला 'चक्र-नेमि-क्रम' हे नाव दिले आहे. संस्कृतची पहिली छाप युरोपीय विद्वानांवर एवढी पडली की ''संस्कृत भाषा म्हणजे अगदी देववाणी आहे असं त्यांना वाटत असे'' (पृ. १७). सर्व दृष्टींनी इंडोयुरोपिअनला संस्कृत जास्त जवळची आहे असे त्यांनी ठरवले होते. परंतु तौलनिक भाषाशास्त्रात प्रगती होऊ लागली तेव्हा असे आढळले की काही बाबतीत ग्रीक व लॅटिन भाषांनी इंडोयुरोपिअनची व्यवस्था संभाळली आहे, उलट संस्कृतने त्यात बदल केले आहेत. माहुलकरांच्या मते संस्कृतच्या भाग्यदशेत हा देखील एक 'चक्र-नेमि-क्रम' म्हणायचा.

'गुण-वृद्धींची संरचना' ह्या तिसऱ्या प्रकरणात माहुलकरांनी सोस्यूरची इंडोयुरोपिअन भाषेतली स्वररचनेची महत्त्वाची कल्पना समजावून सांगितली आहे. इंडोयुरोपिअन या मूळ भाषेचा अभ्यास मध्यंतरी इतका प्रगत झाला की त्या भाषेत एक लहानशी बोधकथा लिहिण्याचे धाडस श्लाइखरने (Schleicher) केले. त्याचे प्रथम कौतुक झाले, तरी असे खेळ खेळण्यात अर्थ नाही हे विद्वानांना लगेच उमगले. त्याच काळात सोस्यूरसारख्या प्रतिभावंताला पाणिनीय गुण-वृद्धि या स्वरपर्याय व्यवस्थेमागचे रहस्य जाणवले. पाश्चात्त्यांनी प्रथम गुणवृद्धीला ablauf असे नाव दिले. सोस्यूरच्या मते इण्डोयुरोपिअन या मूळ भाषेत स्वररचनेची जी विशिष्ट अवस्था होती तिचा गुण-वृद्धि हा अवशेष आहे. या व्यवस्थेला त्याने apophony - माहुलकरांचा प्रतिशब्द 'स्वर-परिक्रमा' - हे नाव दिले. या परिक्रमेचे स्वरूप माहुलकरांनी उदाहरणांच्या द्वारे स्पष्ट केले आहे.

या संदर्भात दोन गोष्टी सांगाव्याशा वाटतात. माहुलकरांनी परिक्रमेच्या शून्यावस्था (zero grade), सामान्य अवस्था (normal grade) आणि दीर्घावस्था (long grade) अशा तीन अवस्था सांगितल्या आहेत. परंतु 'शून्यावस्थे'च्या जोडीने एक 'क्षीणावस्था' (weak grade) कल्पावी लागते. शब्दाच्या सामान्य अवस्थेतला स्वर जेव्हा दुसऱ्या रूपाच्या उच्चारात उरत नाही तेव्हा तिला शून्यावस्था म्हणता येईल, जसे dabhnoti, परंतु a-dbh- uta. दुसऱ्या रूपात dabh मधल्या a स्वराचा लोप आहे. परंतु एका रूपाच्या सामान्य अवस्थेतला स्वर जेव्हा संपूर्ण लोप पावत नाही, त्याचा काही भाग उरतो, तेव्हा ती क्षीणावस्था मानावी लागते. जसे jetum (<*jaitum),परंतु jita. यात *ai या संध्यक्षरातला a तेवढा लोप पावतो i उरतो.

दुसरी गोष्ट अशी: संस्कृत व्याकरणकारांच्या गुण-वृद्धीच्या व्यवस्थेची अवस्था कशी आहे ती समजावण्यासाठी माहुलकरांनी पुढील उदाहरण दिले आहे. एखाद्या ठिकाणी कोणा

एका गवंड्याने फरशा एका विशिष्ट आकृतीत बसविल्या असाव्यात. त्या भग्न होऊन इतस्ततः पडाव्यात. कालांतराने दुसऱ्या गवंड्याने तिथे यावे, भग्न फरशा एकत्र करून पुन्हा बसवाव्यात, परंतु मूळ आकृतीची त्याला कल्पना नसल्याने त्याने निर्माण केलेली आकृती मूळ आकृतीसारखी न होता निराळीच बनावी, अशासारखी अवस्था संस्कृत व्याकरणकारांची झाली असल्याचे माहुलकरांनी म्हटले आहे (पृ.२४). मला हे सर्व अप्रस्तुत वाटते. सोस्यूरने स्वरपरिक्रमा पुनर्रचित इंडोयुरोपिअन भाषेच्या आधारे ठरविली आहे. संस्कृत व्याकरणकारांच्या समोर ती भाषा नव्हती. त्या पुनर्रचित भाषेचे तुकडे घेऊन ते पुन्हा जोडायला व्याकरणकार बसले नव्हते. त्यांच्या व्यवहारात जी भाषा होती तिचे त्यांनी स्वतःच व्याकरणासाठी कल्पिलेले 'तुकडे' घेऊन ते पुन्हा जोडण्याचे काम त्यांनी केले. त्यांत त्यांनी एक व्यवस्था असल्याचे मानले आणि त्या आधारे भाषेत उपयोगात येत असलेली रूपे सिद्ध केली. त्यांच्या व्यवस्थेने अपेक्षित रूपे मिळत गेली, भलतीच हाती लागली नाहीत, यातच त्यांचे यश सामावले आहे. सोस्यूरच्या इंडोयुरोपिअन भाषेतील स्वरपरिक्रमेपेक्षा संस्कृतमधली व्याकरणकारांची स्वरपरिक्रमा निराळी असली तर त्यात आश्चर्य नाही.

'शिष्यादिच्छेत् पराजयम्' ह्या चौथ्या प्रकरणात ध्वनिपरिवर्तनाच्या सामान्य नियमांना आढळणाऱ्या काही अपवादांचे निराकरण करण्यात व्हेर्नेर (Verner) , ग्रासमान (Grassmann) सारख्या विद्वानांना कसे यश आले त्याची माहिती माहुलकर देतात आणि त्या निराकरणाचे भाषाशास्त्रीय महत्त्व स्पष्ट करतात (पृ. ३३). अपवादांचे निराकरण करण्यासाठी युरोपीय विद्वानांना संस्कृत व संस्कृतचे व्याकरणकार यांचे साहाय्य झाले. म्हणजे एका दृष्टीने संस्कृत व्याकरणकार हे युरोपीय विद्वानांचे 'गुरू' ठरले. परंतु काही बाबतीत परिस्थिति उलटी झाली. संस्कृतातल्या निरनिराळ्या संधी प्रकारांपैकी एका प्रकारात न+छिद्यते याचा सन्धि नच्छिद्यते असा होतो. संस्कृत व्याकरणकार सांगतात की या संधीत न मधल्या 'अ'स्वरापुढे त् व्यंजन येते आणि त्+छ चा संधि च्छ होतो. माहुलकर विचारतात: हा त् येतो कुठून? या प्रश्नाला व्याकरणकारांजवळ उत्तर नाही (पृ.३७). ते उत्तर पाश्चात्त्य संशोधकांनी तौलनिक भाषाभ्यासाच्या आधारे दिले. संस्कृत व ग्रीक शब्दांची तुलना करता असे आढळले की संस्कृत *छ वर्ण मुळात* इण्डोयुरोपिअन मधे sk असा संयुक्त वर्ण होता. वरील सारखा सन्धि होताना तो संयुक्त वर्ण च्छ् या रूपे व्यक्त होतो. अशा तऱ्हेने प्रथम संस्कृत व्याकरणकारांनी युरोपीय भाषाविज्ञानींना काही गोष्टी शिकवल्या असल्या तरी नंतर त्यांना काही गोष्टी पाश्चात्त्यांकडून शिकायला मिळाल्या असल्यामुळे माहुलकरांनी या प्रकरणाला 'शिष्यादिच्छेत् पराजयम्' असे नाव दिले आहे.

नाव आकर्षक आहे, त्यात माहुलकरांची कल्पकताही दिसते. परंतु त्यातल्या 'पराजय' शब्दाचा अर्थ फार गांभीर्याने न घेणे बरे. वरील हकीकतीत 'गुरु' मानलेले संस्कृत व्याकरणकार

तौलनिक भाषाभ्यासास बसले नव्हते. एकाच भाषेत उपलब्ध असलेल्या एककालिक सामग्रीच्या आधारे ते व्याकरण सांगत होते. त्यांना उपलब्ध असलेल्या सामग्रीच्या आधारे जर पाश्चात्त्यांनी त्याच भाषेचे व्याकरण अधिक सुलभ पद्धतीने मांडून दाखवले असते तर त्याला खऱ्या अर्थाने पराजय म्हणता आले असते. ''... भाषाविज्ञानीला भाषांच्या भूतकाळाचा विचार करताना परोक्ष दृष्टीची फार आवश्यकता आहे'' असे माहुलकर योग्य तेच सांगतात (पृ.३१). 'च्छिद्यते', 'शिवच्छाया' यासारख्या संधींचा खुलासा करण्यासाठी संस्कृत व्याकरणकारांनी 'त्' या वर्णाची आवश्यकता मानली, म्हणजे इथे कुठल्या तरी दुसऱ्या वर्णाचे अस्तित्व त्यांनी स्वीकारले यात त्यांच्या परोक्षदृष्टीचाच प्रत्यय येतो. प्रसिद्ध लॅरिंजीअलचा सिध्दान्त मांडताना (प्रकरण सहा) सोस्यूरने अशाच अेका अज्ञात ध्वनीची, त्यासाठी प्रत्यक्ष पुरावा नसताना, कल्पना केली होती.

'इतिहासाच्या कोंदणात संस्कृत' ह्या पाचव्या प्रकरणात संस्कृतचा अभ्यास संस्कृत-पुरताच मर्यादित न ठेवता संस्कृतच्या मागच्या तसेच पुढच्या इतिहासाच्या संदर्भात तो व्हावा असा विचार मांडला आहे. त्यासाठी माहुलकरांनी 'भाषा' म्हणजे काय त्याविषयीची स्पष्ट कल्पना शुखार्ट, सोस्यूर, मेये यांनी दिली ती सांगितली आहे. त्या नव्या जाणिवेप्रमाणे ''...प्रात्यक्षिक स्वरूपात भाषा ही एकजिनसी नसून ती आपल्या बोलींच्या वैविध्यात व दैनंदिन नावीन्यात जगते. तिच्या एकजिनसीपणाची व तिच्या आधारावर मानलेल्या तिच्या एकत्वाची पुनर्रचना हा विद्वानांनी घडविलेला एक तात्त्विक खेळ आहे.'' (पृ.४५). ''पूर्णत्वानं भाषिक एकत्व कुठंही सापडत नाही'' (पृ. ४५-४६) हे खरे असले तरी कुठल्याही भाषेचे वर्णन करते वेळी ती एकजनसी स्वरूपाची असल्याचे गृहीत धरावे लागते. शुखार्टचे म्हणणे मान्य झाल्यावरही इंडोयुरोपिअनच्या पुनर्रचनेविषयी कल्पना करण्याचे पाश्चात्त्य भाषाविद्वानींनी थांबवले नाही.

भाषेच्या ऐतिहासिक-तौलनिक अभ्यासाची आवश्यकता पाश्चात्त्यांकडून कळल्यावरही आपल्या विद्वानांना अशा अभ्यासाचे वैज्ञानिक महत्त्व जाणवले नाही हे सांगितल्यावर (पृ. ४१) माहुलकर त्याची दोन कारणे असल्याचे सांगतात. एक कारण, असे केल्यामुळे संस्कृतच्या त्यांनी मानलेल्या व्याकरण-व्यवस्थेत गोंधळ उडेल ही भीती, आणि दुसरे कारण अशा तऱ्हेच्या अभ्यासाला भारतीय परंपरेत स्थान नाही. मला ही कारणे पटत नाहीत. 'गोंधळ उडेल' म्हणजे काय होईल ते माहुलकर स्पष्ट करत नाहीत. कदाचित त्यांना असे म्हणायचे असेल की व्याकरणीय परंपरेनुसार 'गम्' धातूपासून 'गत' रूप सिद्ध करताना त्यांनी 'म्' चा लोप झाला असल्याचे मानले, त्याऐवजी त्यांना gam मधल्या 'a' स्वराचा लोप होऊन 'm' व्यंजनाचे जागी 'm̥'असा स्वर येतो व त्याचा 'अ' होतो असे मानावे लागले असते, इत्यादी, परंतु हे खरे कारण नव्हे. दुसऱ्या कारणाविषयी बोलायचे तर एखाद्या प्रकारच्या अभ्यासाला परंपरेत स्थान नसले तरी एखाद्या नव्या विद्यास्थानाचा स्वीकार करणे भारतीय विद्वानांनी प्रतिषिध्द मानले होते असे वाटत नाही. माझ्या मते खरे कारण हे आहे, की ह्या नव्या अभ्यासाचे महत्त्व लक्षात

येऊनही त्याचा उपयोग करण्यासाठी जी सिद्धता लागते त्यासाठी परिश्रम करण्याचे कोणीही मनावर घेतले नाही. पाश्चात्त्यांनी ग्रीक, लॅटिन इत्यादी भाषांबरोबर संस्कृतवर अधिकारवाणीने बोलता येईल इतका जसा तिचा अभ्यास केला तसा आमच्याकडील एकाही भाषावैज्ञानिकाने ग्रीक, लॅटिन इत्यादी भाषांचा केला नाही. फार काय संस्कृतला अगदी जवळच्या असलेल्या प्राचीन इराणी भाषेच्या वाटेलाही फारसे कोणी गेले नाही. परक्या भाषांविषयी जिज्ञासा निर्माण होणे, त्यांवर प्रभुत्व मिळवण्यासाठी आवश्यक तो अभ्यास करणे, ह्या प्रवृत्ती जशा गेल्या शे-दोनशे वर्षांत आमच्याकडे दिसल्या नाहीत तशाच फार पूर्व काळीही त्या नसाव्यात. एरवी पतञ्जलीच्या काळापासून तरी ग्रीकसारख्या एखाद्या भाषेकडे भारतीय वैयाकरणाचे लक्ष जाऊन त्या भाषेचा अभ्यास व्हायला व त्या अनुषंगाने संस्कृत व ग्रीक भाषेतली साम्यस्थळे लक्षात यायला हरकत नव्हती. तेवढी कुशाग्र बुद्धी भारतीय वैयाकरणांजवळ नक्कीच होती. तसे घडले असते तर भाषेच्या वर्णनात्मक अभ्यासाबरोबरच तौलनिक अभ्यासाची मुहूर्तमेढ भारतातच रोवली गेली असती.

सहाव्या 'लॅरिंजीअलचा सिद्धान्त' ह्या प्रकरणात माडुलकरांनी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या सुरुवातीस ज्या नव्या भाषा ज्ञात झाल्या त्यांच्या साहाय्याने इंडोयुरोपिअन भाषेवर -विशेषतः तिच्या स्वरव्यवस्थेवर- जो प्रकाश टाकण्यात आला त्याची माहिती दिली आहे. हिटाइट भाषेचा शोध लागण्यापूर्वीच सोस्यूरने त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेने इंडोयुरोपिअन भाषेत एक नवा घोष वर्ण-ज्याला पुढे 'लॅरिंजीअल' असे नाव देण्यात आले - असल्याची कल्पना केली होती. या कल्पनेच्या आधारे इंडोयुरोपिअन भाषेमधले दीर्घ स्वर मुळात ऱ्हस्व स्वर अधिक लॅरिंजिअल असे असले पाहिजेत असा तर्क सोस्यूरने केला. ह्या तर्काला कुरिलोविच (Kurylowicz - मी ऐकलेला उच्चार कुरिवॉविच) या पोलिश भाषावैज्ञानिकाने हिटाइटमधे आधार असल्याचे दाखवून दिले. त्यामुळे सोस्यूरच्या तर्काला बळकटी आली. लॅरिंजिअलच्या शोधामुळे संस्कृतातील स्था- स्थित, पा-पिब् इत्यादी जोडींचे खुलासे सांगता येऊ लागले.

पुस्तकाच्या 'बहिरंग' ह्या पहिल्या विभागाचे 'इंडोयुरोपिअनचा नवा नकाशा' हे सातवे व शेवटचे प्रकरण आहे. त्यात इंडोयुरोपिअन भाषांशी संबधित अथवा त्या भाषाकुळातल्या काही नव्या भाषांच्या ज्ञानामुळे इंडोयुरोपिअन भाषेच्या मूळ वसतिस्थानाविषयीच्या आणि तिथून त्यांनी केलेल्या स्थलांतराविषयीच्या आधीच्या कल्पना काही प्रमाणात बदलाव्या लागल्या असल्याचे सांगितले आहे. इंडोयुरोपिअन भाषेच्या मूळ वसतिस्थानाविषयीचा प्रश्न आजही सुटला आहे असे नाही. तथापि ह्या विषयीच्या मतमतांतरातले एक प्रा. थीम (Thieme) यांचे मत विचारात घेण्यासारखे आहे असे मला वाटते (Die Heimat der indogermanischen Gemeinsprache 1953). त्यांच्या मते हे वसतिस्थान जर्मनी आणि पोलंड देशांच्या सरहद्दी

जिथे मिळतात आणि जिथल्या नद्यांत salmon जातीचे लाल मासे विपुल प्रमाणात सापडतात त्या मध्य युरोपातल्या भूभागात असले पाहिजे. ह्या प्रकरणात माहुलकरांनी भारताच्या प्राचीन इतिहासाचे दिग्दर्शन घडविले आहे ते वाचनीय आहे. त्या घटनांचे धक्के भारतीय भाषांना कसे बसले हे त्यांचे विवेचन उद्‌बोधक आहे. या प्रकरणात पुन्हा एकदा विल्यम जोन्सच्या प्रसिद्ध उपपत्तीचा उल्लेख करुन (पृ. ६५) माहुलकरांनी ह्या शेवटच्या प्रकरणाचा पहिल्या 'सोनियाचा दिवस' ह्या प्रकरणाशी सांधा जुळवला आहे. या प्रकरणातली माहुलकरांची काही वाक्ये मनात भरण्यासारखी आहेत. इसवी सनाच्या आठव्या शतकापासून भारताच्या पश्चिमेकडून जी धार्मिक असहिष्णुता फोफावू लागली तिला उद्देशून ते म्हणतात. ''आता यापुढील इतिहास आपल्याला दिसायला नको या भीतीनं की काय, सिंधमधली ती सरस्वती लौकरच वाळवंटात लुप्त झाली!'' (पृ. ६३). तसेच भारताच्या उत्तरेला आणि दक्षिणेला दोन युरोपिअनांनी निरनिराळ्या काळी केलेल्या आगमनाला उद्देशून ते म्हणतात: ''इ. स. पूर्व ३२६ मध्ये उत्तरेत अलेक्झांडरने आखलेली भारताची भाग्यरेषा वास्को-द-गामानं वळवून दक्षिणेत नेली -भूमीवरून सागराकडे'' (पृ. ६५).

माहुलकरांच्या पुस्तकाचा पूर्वभाग वाचूनच त्यांच्या विद्वतेची कल्पना येते. त्यांचे वाचन बहुविध, चिंतन मूलगामी आणि लेखन सहज असते. त्यांनी तळटीपांतून उल्लेखिलेले ग्रंथ पाहिले तरी थकायला होते. पूर्व भागातल्या विषयाशी - ऐतिहासिक -तौलनिक भाषाशास्त्राशी- माझा थोडाफार परिचय असल्याने मी तो भाग समजू शकलो व मला त्या भागाविषयी काही लिहिता आले. परंतु उत्तर भागातला विषय-भाषेचे अंतरंग मला-बराचसा अपरिचित आहे, तेव्हा त्याविषयी फारसे लिहिणे कठीण आहे. ह्या भागाचे परीक्षण करायचे तर तत्त्वज्ञान, गणित अशांसारख्या अवघड शास्त्रांतही गती हवी. ती पूर्वतयारी माझ्याकडे नाही.

दुसऱ्या 'अंतरंग' विभागाच्या पहिल्या प्रकरणाचे नाव 'गुरु-शुक्र - युती' सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि अठराव्या शतकाच्या प्रारंभी होऊन गेलेल्या लीबनिझ ( Leibniz -उच्चार बहुधा लाइबनिझ असावा) याला माहुलकर 'शुक्र' आणि पाणिनीला 'गुरु' ग्रह मानतात. पाणिनी-लीबनिझ यांची भेट झाली अमेरिकेत, या त्यांच्या भेटीला उद्देशून माहुलकरांनी 'गुरु -शुक्र-युती' असे प्रकरणाचे चमत्कृतिपूर्ण नाव निवडले आहे. जगाच्या अत्याधुनिक बौद्धिक अभ्यासाची मुहूर्तमेढ त्यांच्या युतीमुळे झाली (पृ. ७७).

ह्या प्रकरणात माहुलकरांचा भर भाषेत होणारे बदल 'परिवर्तन' (change) स्वरूपाचे नसून 'प्रतियोजन' ( substitution) स्वरूपाचे असतात हे स्पष्ट करण्यावर आहे. शेरेर (Scherer) , सोस्यूर यांचे म्हणणे असे की भाषावैज्ञानिकांनी ध्वनिपरिवर्तनाच्या मागे न लागता भाषेत घडून येणाऱ्या प्रतियोजनांमागील तत्त्वांचा शोध घ्यायला हवा. तो खरा भाषाभ्यास आहे (पृ. ७८, तसेच प्रस्तावना, पृ. एकोणीस).

'परिवर्तना' कडून 'प्रतियोजना'कडे जाण्याचा जो इतिहास माहुलकरांनी सांगितला आहे तो सर्वसाधारण वाचकाला समजेलच असे नाही. त्याला तो कोणाकडून तरी समजून घ्यावा लागेल. भाषाविज्ञानाला यापुढे नवे वळण लागल्याचे सांगताना पूर्वीच्या अभ्यासाला 'व्याकरणाचा कंदिल' असे म्हटल्याने (पृ. ७९) हिणवल्यासारखे होते. तसे केले नसते तर बरे झाले असते. 'बहिरंग' विभागात ऐतिहासिक तौलनिक भाषाभ्यासाचा उदोउदो केल्यानंतर त्याकाळच्या अभ्यासकांनी ध्वनींवर भर दिल्याने त्यांच्या हातून 'पुष्कळ प्रमाद' घडले अशासारखे विधान (पृ.८२) करणे योग्य आहे असे वाटत नाही.

माहुलकरांनी पृ. ७८ वर जैमिनीचे सूत्र 'वर्णान्तिरं, अविकार:' हे उद्धृत केले आहे. ते सूत्र मूळ ग्रंथात ज्या संदर्भात येते तो पाहता भाषा ही एक प्रतीक-व्यवस्था आहे, तिच्यात ध्वनिविषयक होणारे फेरफार परिवर्तनस्वरूप नसून प्रतियोजनस्वरूप असतात, म्हणून भाषा ही एक नवनिर्मितिक्षम व्यवस्था आहे हे जे अलीकडील भाषावैज्ञानिकांना सांगायचे आहे ते जैमिनीला दध्यत्र या संधीत 'इ' चा 'य' हा विकार नसून, तो एक दुसरा वर्ण आहे (परिवर्तन नसून, प्रतियोजन आहे) हे सांगताना सुचवायचे होते असे मला वाटत नाही. ते सूत्र शब्दनित्यत्वाधिकरणात आहे. भाषेत आढळणारे ध्वनिविषयक बदल ('इ' च्या जागी 'य' ) ही जर विकृती मानली तर शब्द अनित्य ठरेल. तसा तो ठरू नये हे सिद्ध व्हावे म्हणून जैमिनीने ध्वनिविषयक बदल हे वर्णान्तर असल्याचे मानले आहे.

ह्या प्रकरणात माहुलकर एके ठिकाणी (पृ. ७८) म्हणतात: पाणिनीने ग्रंथारंभी 'वृद्धि:' असा शब्द योजून आशीर्वाद देऊन ठेवला आहे . हा आशीर्वाद त्याने कुणाला दिला? शिष्यांना तर खासच नसावा कारण 'वृद्धि:' ह्या शब्दाने पाणिनी त्याच्या शिष्यांना आशीर्वाद देत आहे हा त्या शब्दयोजनेचा परंपरेत असलेला एक खुलासा माहुलकरांना मान्य नाही (प्रस्तावना, पृ.सतरा). मग आशीर्वाद भाषेला दिला? पण भाषेत प्रतियोजने नित्य होत असल्यामुळे बदलत राहणे, विकास करीत राहणे, ही तर तिची प्रकृतीच आहे. तिला ह्या आशीर्वादाची गरज नाही. तो नसला तरी भाषा नवनिर्मितिक्षम राहणारच. एखादी इष्ट घटना घडेल की नाही असा संशय असला तर ती घडावी म्हणून आशीर्वादाची आवश्यकता, ती घडणारच असेल तर आशीर्वाद कशाला?

'नव्या दिशांचा शोध' ह्या नवव्या प्रकरणात माहुलकर काही जुन्या भाषावैज्ञानिकांबरोबर नव्या वैज्ञानिकांचा आणि त्यांच्या विचारांचा उल्लेख करतात. नव्या दिशांत पहिला उल्लेख 'सामाजिक भाषाविज्ञाना' चा (socio-linguistics) झाला आहे. कुठल्याही भाषेला ती बोलणाऱ्या समाजाहून अलग असे स्वतंत्र अस्तित्व नसल्याने, ती सर्वस्वी समाजावर अवलंबून असते. तेव्हा तिच्या ऐतिहासिक अभ्यासाबरोबर तिचा सामाजिक दृष्टिकोनांतून अभ्यास व्हायला हवा असे नव्या अभ्यासकांचे म्हणणे आहे.

भाषेच्या नव्या दृष्टिकोनातून अभ्यास होण्याविषयीच्या संदर्भात माहुलकरांनी नोआम चोमस्की (Noam Chomsky) याच्या अेका निबंधाचा उल्लेख केला आहे. अमेरिकेत त्या काळी हॅरिसने (Z. Harris) सुरू केलेल्या 'संरचनात्मक भाषाविज्ञान' (structural linguistics) या पद्धतीचा जो उदोउदो चालला होता त्याला आळा घालण्याचा प्रयत्न चोमस्कीने केला. त्याच्या मते भाषेच्या नवनिर्मितिक्षमतेचे स्वरूप ज्यात स्पष्ट होत नाही अशा सिद्धांताचा उपयोग भाषाभ्यासात फारसा होत नाही.

ग्रिमची शतसंवत्सरी साजरी झाली (१९६३), पण चार वर्षांनी बोपची तशी झाली नाही (१९६७), त्याची कारणे माहुलकरांनी स्पष्ट केली आहेत. या निमित्ताने लीबनिझ, बूल, सोस्यूर यांच्या विचारांचा पुन्हा उल्लेख झाला आहे. भाषेचे घटक 'प्रतीक' असतात आणि ही प्रतीके, म्हणजे ध्वनिरूप शब्द (signifier) आणि त्यांचे अर्थ (signified), यांची परस्परांपासून अलग न करता येण्यासारखी, युग्मे असतात. 'एकाच कागदाची वरील बाजू व मागील बाजू यांच्या प्रमाणे' ती जोडलेली असातात.

इंग्रजी भाषेत foot शब्दाचे बहुवचन foots होत नाही, feet होते, हा त्या भाषेच्या बहुवचनाविषयीच्या सामान्य व्यवस्थेचा अपवाद आहे असे म्हणण्यात काही गैर आहे असे मला वाटत नाही. प्राचीन इंग्रजीतील बहुवचनी fōtr या रूपात कालक्रमाने ध्वनिपरिवर्तने झाल्याने सध्या feet असे रूप आढळते असे दाखवता येत असले तरी सध्या feet हे रूप अपवादच मानायला हवे. ह्या प्रकरणाच्या अखेरीस माहुलकरांनी 'परिवर्तना' ला अगदीच तुच्छ लेखले नाही. 'परिवर्तन' व 'प्रतियोजन' हे प्रतीकव्यवस्थेत घडणारे दोन प्रकार आहेत असे ते मानतात (पृ. ९४), इतकेच नव्हे तर fotr पासून feet ची सिद्धि समजावीत असताना -ō- या स्वराच्या जागी -ē - या स्वरांतराचे प्रतियोजन झाले असे न म्हणता, -ō- चा -ē- स्वर 'बनला' असे ते म्हणतात (पृ. ९३).

अखेरची तीन प्रकरणे (१०,११,१२) 'इतिहासाचा मागोवा', 'भाषेच्या अंतरंगाकडील वाट' आणि 'उपसंहार' ह्या नावाची आहेत. माहुलकरांच्या पुस्तकातला हा सर्वांत अवघड असा भाग आहे. ह्यांत माहुलकरांनी इतक्या विविध विद्वानांची आणि त्यांच्या ग्रंथांची नावे, तसेच त्यांतो मते सांगितली आहेत, की ती वाचणारा कौतुकमिश्रित आश्चर्याने थक्क होतो.

आंकेतिल द्यु पेराँ (Anquetil du Perron) (अवेस्ता ग्रंथाची पाश्चात्त्यांना प्रथम ओळख करून देणारा) आणि विल्यम जोन्स (संस्कृत, ग्रीक इत्यादी भाषा एका अज्ञात भाषेपासून उद्भवल्या आहेत हे प्रथम सांगणारा) यांच्यामुळे भाषा आणि भाषाशास्त्र यांच्या अभ्यासाला चालना मिळून जी प्रगती झाली त्याचे धावते अवलोकन 'इतिहासाचा मागोवा' या प्रकरणात आहे. तसेच भाषेच्या अभ्यासात तिच्या इतिहासाबरोबरच तिच्या भूगोलाचे महत्त्व लक्षात येऊन त्या दिशेने कसा विचार होत गेला ते माहुलकरांनी सांगितले आहे. प्रकरणाच्या अखेरीस

यूरोपच्या इतिहासात कोपरनिकसपासून सोस्यूरपर्यंत ज्ञानाभ्यासाने कोणती वळणे घेतली ती सांगितली आहेत.

'भाषेच्या अंतरंगाकडील वाट' ह्या प्रकरणात माहुलकरांना सांगायचे आहे ते असे असावे असे वाटते : तुलनात्मक भाषाभ्यास हा भाषेतील 'स्थिर' तत्त्वांवर आधारलेला असल्यामुळे तो बहिरंगी बनला. भाषेच्या अंतरंगाला त्याने स्पर्श केला नाही. त्यासाठी सोस्यूरच्या विचारांप्रमाणे भाषेच्या 'अस्थिर' तत्त्वांना, तिच्या नवनिर्मितीक्षमतेला स्पर्श करणारा अभ्यास व्हायला हवा. एखादे लहान मूल भाषा कसे शिकते हे जोपर्यंत आपणांस कळत नाही तोपर्यंत भाषेचे अंतरंग आपणांस समजणार नाही.

माहुलकरांनी शेवटच्या 'उपसंहार' या प्रकरणात काय सांगितले आहे ते सांगणे फार अवघड आहे. थोडक्यात सांगता येईल असा तो विषय नाही, आणि सहज समजण्यासारखाही नाही. तेव्हा ते साहस मी करत नाही.

* * *

माहुलकरांच्या पुस्तकाच्या परीक्षणाचे मुख्य काम संपले आहे. पुस्तक विद्वत्ताप्रचुर आणि माहितीने पुरेपूर भरलेले आहे. पुस्तक रोचक व्हावे म्हणून त्यांनी अधून मधून मनोरंजक गोष्टी सांगितल्या आहेत (उदा. प्रस्तावना पृ. अठरा; पृ.९८ -९९; पृ.११४), सहज समजतील अशी उदाहरणे दिली आहेत (उदा. पृ. २७, पृ.११७, पृ. १३४), काही सुरेख वाक्यांची पेरणी केली आहे ( याची काही उदाहरणे आधी दिली आहेत. आणखी पृ. ६५. ३-५; पृ.६६. १-२). त्यांच्या सुविद्य पत्नीने त्यांच्याकडून केलेली अपेक्षा - माहुलकरांनी त्यांची भूमिका सोप्या पद्धतीने मांडावी (मनोगत, पृ. तेरा) - पूर्ण करण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला आहे. ती ते संपूर्णपणे पुरी करू शकले नसले, पुस्तक काही ठिकाणी दुर्बोध राहिले असले, तर तो दोष माहुलकरांचा नाही, वाचकाची पुरेशी पूर्वतयारी नसण्याचा आहे. त्यांची काही वाक्ये सूत्ररूप आहेत, त्यावर भाष्याची आवश्यकता आहे. माहुलकर आज आपल्यात असते तर तसे भाष्य लिहिण्याची विनंती मी त्यांना केली असती. तसेच वर उल्लेखिलेल्या माझ्या काही मतभेदांची त्यांच्याशी चर्चा करून मी माझे शंका-समाधान करून घेतले असते. आता ती शक्यता उरली नाही हा विचार मनाला खिन्न करणारा आहे.

अखेरीस काही चुकीची विधाने, अपुरी अथवा चुकीची माहिती, त्रुटी, इत्यादी किरकोळ गोष्टींचा निर्देश करणे प्राप्त आहे. ह्या दोषांमुळे विषयाच्या मुख्य प्रतिपादनाला बाध येत नाही. काही मतभेदांचा उल्लेख वर झाला आहे.

**१) चुकीची विधाने :-**

१) पृ. २-३: ऋग्वेदाच्या ''बऱ्याचशा भागांची रचना भारतात प्रवेश करण्यापूर्वी





अनुक्रमणिका

झाली असावी''. ही कल्पना ठीक नाही. ऋग्वेदातील सूक्तांची रचना भारतातच झाली आहे.

२) पृ. ४. ८-९ : माहुलकर म्हणतात, ब्लूमफील्डने पाणिनीच्या ग्रंथाचा ''मानवी बुद्धिमत्तेची एक श्रेष्ठ अमरनिर्मिती'' अशा शब्दांनी गौरव केला. ब्लूमफील्ड तसे म्हणत नाही. . तो म्हणतो ते असे की मानवी बुद्धिमत्तेच्या ज्या काही श्रेष्ठ अमरकृती आहेत त्यांपैकी पाणिनीची अष्टाध्यायी ही एक आहे. तीच अेक श्रेष्ठ अमरकृती आहे असे तो म्हणत नाही (पहा पृ. १० तळटीप १).

३) पृ. १३.१ : रास्कने त्याचे नॉर्स भाषेचे व्याकरण १८५१ साली प्रसिद्ध केल्याचे म्हटले आहे. परंतु रास्कचा मृत्यू १८३२ साली झाला (पृ. १८, तळटीप १). पुस्तकाच्या प्रसिद्धीचा सन १८१८ आहे. (Holger Pedesen : The Discovery of Language (Eng. tr. by J. W. Spargo p. 248). माहुलकरांची चूक अनवधानाने झाली आहे.[६]

४) पृ. २५ शेवटची ओळ : ग्रीक oi ही ei ची दीर्घावस्था नाही. ei :oi ह्यांतला फरक गुणात्मक ( qualitative) आहे, ऱ्हस्वदीर्घात्मक ( quantitative) नाही.

५) पृ. ३०.४ : भाषेचे एककालिक वर्णनात्मक व्याकरण आणि तिचे ऐतिहासिक व्याकरण यांच्या हेतूंत फरक आहे. त्यामुळे एककालिक व्याकरण लिहिताना भाषेच्या ऐतिहासिक घटनांना स्पर्श न झाला तर त्यामुळे ते व्याकरण 'अपूर्ण' किंवा काही अंशी 'चुकीचं' असते असे म्हणणे योग्य नाही. एककालिक व्याकरण जर व्याकरणकारासमोर असलेल्या सर्व सामग्रीला स्पर्श करत नसेल तर ते अपूर्ण ठरेल, आणि त्या व्याकरणाने अपेक्षित रूपांऐवजी दुसरीच रूपे सिद्ध होऊ लागली तर ते चुकीचे ठरेल, एरवी नाही.

६) पृ. ४१. २ (खालून) : संस्कृत भाषेचे गद्यरूप उपनिषदांपूर्वी ब्राह्मणग्रंथात प्रथम आढळते.

७) पृ. ४२. १-२: प्राचीनांनी 'छांदस् आणि संस्कृत' असा भेद केला नाही, 'छंदस् आणि भाषा' असा केला. ह्या पृष्ठावर अनेकदा छांदस् छापले आहे त्या ऐवजी छंदस् हवे.

८) पृ. ४६. ७ (खालून) : अटवी- 'रान' हा वेदोत्तर संस्कृत शब्द वैदिक बोलीत अतवी असा आढळतो असे माहुलकर कसे म्हणतात कळत नाही. वेदोत्तर संस्कृतात अट् 'फिरणे' असा धातू आहे. त्याचे पूर्वरूप अत् असे वैदिक संस्कृतात आढळते हे खरे, पण वेदात अतवी असा शब्द नाही. सामान्यत: अटवी 'रान' हा शब्द द्राविड भाषांतून संस्कृतात आला असल्याचे मानण्यात येते. संस्कृतात *अवृत्ति ('ज्याला कुंपण नाही' ) असा शब्द कल्पून त्यापासून अवटी, आणि मग वर्णविपर्ययाने अटवी अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ती प्रा. थीम (Thieme ) यांनी सुचविली आहे. त्यांनी द्राविडी व्युत्पत्ती टाळली पण शब्दसिध्दीसाठी द्राविडी प्राणायाम त्यांना टाळता आला नाही. (M. Mayrhoter : kurg. Etym. woertertuch...).

९) पृ. ६०. ६-५ (खालून) : माहुलकर सांगतात की अशोकाच्या शिलालेखांचे ॲरेमॅइक (Aramaic) व (क्वचित) ग्रीक भाषांतर आढळते. परंतु भारत आणि पाकिस्तान येथे आढळणाऱ्या अशोकाच्या कुठाल्याही शिलालेखाचे असे भाषांतर आढळत नाही. काही वर्षांपूर्वी अफगाणिस्तानात सापडलेल्या अशोकाच्या शिलालेखाचे तेवढे तसे भाषांतर केले आहे असे मागे वाचल्याचे आठवते.

१०) पृ. ६३. (खालून) ५ : अवेस्ता व गाथा या नावांचे झरथुश्त्री लोकांचे दोन निराळे ग्रंथ नाहीत. अवेस्ता या नावाचा त्यांचा एकच ग्रंथ आहे आणि त्याचा गाथा हा एक भाग आहे. अवेस्ताचे यस्न, वीस्परद्, वंदिदाद, वगैरे जे भाग आहेत त्यांतल्या यस्न या भागात गाथांचा अंतर्भाव होतो. त्या एकंदर पाच आहेत : १) यस्न २८-३४; २) यस्न ४३-४६; ३) यस्न ४७-५०; ४) यस्न ५१; ५) यस्न ५३.

११) पृ. ६४. १२ आणि १० (खालून) : इ. स. १२२१ - २२ म्हणजे तेरावे शतक. त्यानंतर दोन शतकांनी येणाऱ्या शतकाचा चौदावे शतक असा उल्लेख झाला आहे. माहुलकरांना बहुधा 'एक शतकानंतर' म्हणायचे असावे.

१२) पृ. ६६. १० -११ : बेहिस्तूनच्या शिलालेखांच्या वाचनाने ज्या भाषांच्या संगमाची जाणीव झाली त्यांत द्राविड भाषा कशी असेल?

१३) पृ. १०३. १३ : लंडनमधील प्राच्यविद्याअभ्यास संस्थेला लॉर्ड कर्झनच्या काळी (१८५९-१९२५) School of Oriental and African Studies हे नाव नव्हते. १९३८-३९ पर्यंत त्या संस्थेच्या नियतकालिकाला Bulletin of the School of Oriental Studies हे नाव होते पुढे त्यांत 'African' शब्दाची भर पडली (Vol. 10, 1940-42).

१४) पृ. १३४. ७ (खालून) : शनैः 'सावकाश, हळू' या संस्कृत अव्ययाची, व्युत्पत्ती माहुलकर अशी सांगतात : प्राचीन काळी शन या शब्दाला 'दगड' असा अर्थ होता. पर्वताळ प्रदेशातील नदी ओलांडताना दगडावर संभाळून एकेक पाय ठेवून चालावे लागते म्हणून शनैः शनैः (शब्दशः अर्थ 'दगडा- दगडांनी') या वाक्प्रयोगाला 'हळूहळू' हा अर्थ प्राप्त झाला. ही व्युत्पत्ति त्यांची स्वतःची की अन्य कुणी सुचवली आहे, कल्पना नाही. संस्कृतात अश्मन् 'दगड' शब्द आहे. अश्ना(तृ. ए.) सारख्या रूपात आढळणारा अशन् शब्दही दगडवाची आहे. तो अश्मन् शी संबंधित असावा असे अभ्यासकांचे मत आहे. संस्कृत श्मशान शब्दाची फोड श्मन्+शी- अशी असावी अशी एक कल्पना आहे. यात जसा अश्मन् मधल्या 'अ' चा लोप मानला आहे तसा अशन् मधल्या 'अ' चा लोप मानून आणि 'शन्' ला स्वरांत करून माहुलकरांनी शन शब्द मिळवला असल्यास नकळे. एरवी शन शब्दाचा उल्लेख उपलब्ध कोशांत नाही.





अनुक्रमणिका

## (२) अपुरी अथवा चुकीची माहिती

१) पृ. ४२. ९-८ (खालून) : फ्रीडरिख रोझेन (Friedrich Rosen) या लंडन विद्यापीठात संस्कृतच्या प्राध्यापकाचे काम करणाऱ्याविषयी माहिती फार अपुरी आहे. रोझेनने १८३० साली ऋग्वेदाचे काही नमुने Specimens प्रसिद्ध केले एवढेच सांगितले आहे. वास्तविक हे सांगितले नसते तरी चालले असते. १८३८ साली त्याची ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाची (म्हणजे पहिल्या मंडलातील पहिल्या १२१ सूक्तांची) संहिता लॅटिन भाषांतरासह प्रसिद्ध झाली, त्यात पहिल्या ३१ सूक्तांवर लॅटिन टीपाही आहेत, ही माहिती सांगायला हवी होती. त्या काळी हे फार मोठे काम होते. मॅक्स म्यूलरच्या ऋग्वेद संहितेचा पहिला खंड १८४९ साली प्रसिद्ध होई पर्यंत सुमारे दहा वर्षे युरोपातील संस्कृत अभ्यासक रोझेनच्या प्रतीचा उपयोग करीत असत. संपूर्ण ऋग्वेद संहिता-लॅटिन भाषांतर, टीपा, प्रस्तावना आणि सूचीसह - प्रसिद्ध करण्याचा रोझेनचा मनोदय होता. दुर्दैवाने १८३७ साली, वयाच्या ३२व्या वर्षी, त्याचा अकाली मृत्यू झाल्यामुळे त्याचा संकल्प सिद्धीस गेला नाही. वर उल्लेखिलेला ऋग्वेदाचा भाग त्याच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध करण्यात आला. (आधार: E. Windisch, Geschichte der Sanskrit Philologie ... खंड १, पृ. ९३-९४)

२) पृ. ९७, ९-५ (खालून) : आंकेतिल द्यु पेराँ ( Anquetil du Peron) या फ्रेंच अभ्यासकाच्या माहितीत दोन चुकीची विधाने आहेत. आंकेतिलने अवेस्ताचे भाषांतर सुरतेस केले, आणि आंकेतिल १७६१-७१ ऑक्सफर्ड येथे अवेस्ताचा अभ्यास करीत राहिला, ही दोन विधाने खरी नाहीत. आंकेतिलची माहिती रंजक तशीच उद्बोधक आहे. तीव्र जिज्ञासेने झपाटलेला माणूस काय साधू शकतो त्याचे आंकेतिल एक उत्तम उदाहरण आहे. आंकेतिल या फ्रेंच नागरिकाने १७५४ साली पॅरिस येथे अवेस्ता ग्रंथातील काही ओळी अवेस्ता लिपीत प्रसिद्ध झालेल्या पाहिल्या. त्या कुणाला वाचता येत नव्हत्या, त्यांचा कुणाला अर्थ समजत नव्हता. तो समजून घेण्यासाठी आंकेतिलने भारतास जाण्याचा निश्चय केला. त्यासाठी भारतास निघालेल्या फ्रेंच पलटणीत तो दाखल झाला. पलटणीत दाखल होण्यामागचा आंकेतलचा हेतू फ्रेंच सरकारच्या ध्यानी आल्यावर त्याला सैन्यातून मुक्त केले आणि त्याची भारतास जाण्याची व्यवस्था केली. भारतात आल्यावर मजल दरमजल करीत तो सुरतेस पोचला. तिथे पारशी लोकांत सात वर्षे राहून त्यांचा विश्वास संपादन केला. पारशी धर्मगुरूंशी बोलता यावे म्हणून फारसी शिकला . त्यांच्याकडून तो अवेस्ता लिपी आणि अवेस्ता भाषा शिकला. अवेस्ता ग्रंथ समजावून घेतला. त्यांच्याकडून त्याने अवेस्ताची काही हस्तलिखिते मिळवली आणि एवढे कार्य संपादून तो पॅरिसला १७६१ साली परतला. पॅरिसला परतण्यापूर्वी वाटेत ऑक्सफर्ड येथे थोडे दिवस थांबून त्याला मिळालेली हस्तलिखिते तिथल्या लायब्ररीतल्या हस्तलिखितांशी ताडून पाहून ती अस्सल

असल्याची त्याने स्वत:ची खात्री करून घेतली. पॅरिसला आल्यावर दहा वर्षे हस्तलिखिते वाचून, अभ्यास करून १७७१ मधे त्याने त्याचे अवेस्ता भाषांतर फ्रेंच भाषेत प्रसिद्ध केले ("Ouvrage de Zoroastre" तीन खंड). अवेस्ताची युरोपला झालेली ही पहिली ओळख (आधार: A. W. Williams Jackson यांची Encylopaedia of Religion and Ethics. खंड २, 'अवेस्ता' वरील नोंद). या हकीकतीवरून आंकेतिलने अवेस्ता भाषांतर सुरतेस केले नव्हते, आणि तो १७६१-७१ दहा वर्षे ऑक्सफर्डला राहिला नव्हता हे ध्यानात येते. वर दिलेली सर्व हकीकत माहुलकरांनी देण्याचे अर्थातच कारण नव्हते.

### (३) त्रुटी

१) पृ. ३२. १ : 'प्रथमे हि विद्वांसो वैयाकारणा:' हे आनन्दवर्धनाचे वाक्य म्हणून माहुलकरांनी उद्धृत केले आहे, पण वाक्याचा संदर्भ सांगितला नाही. तो संदर्भ ध्वन्यालोक १.१३ असा आहे.[७]

२) पृ. ५२.६: माहुलकरांच्या वाक्यामुळे वाचकाचा समज होतो की 'शंभर' ह्या अर्थी हिटाइट व तोखारिअन दोन्ही भाषांत शब्द आहेत. माहुलकरांनी दिलेले दोन्ही शब्द तोखारिअन A आणि B या त्या भाषेच्या दोन बोलीतले आहते. हिटाइट भाषेतला 'शंभर' ह्या अर्थाचा 'क' वर्णाने सुरू होणारा शब्द त्यांनी दिला नाही. माझ्या कल्पनेप्रमाणे तसा शब्द हिटाइटमधे उपलब्धही नाही. त्या ऐवजी संस्कृत श्: हिटाइट क् ह्यासाठी संस्कृत Srad हिटाइट kard हे उदाहरण देणे शक्य होते

३) पृ. ९६ : प्रकरणाच्या सुरुवातीस सॅम्युएल जॉन्सनने अर्ल ऑफ चेस्टरफील्डला स्वाभिमानी भाषेत लिहिलेल्या, पत्राचा उल्लेख माहुलकरांनी केला आहे. माहुलकरांनी ते पत्र किंवा ते पत्र कोठे वाचायला मिळेल, याचा संदर्भ द्यायला हवा होता.

४) पृ. ११०. २ (खालून) : सोस्यूरने मांडलेल्या 'यदृच्छा' संकल्पनेचा उल्लेख ग्रंथात आधी कोठे झाला नाही. त्या कल्पनेचा खुलासा आणि त्यासाठी सोस्यूरचा संदर्भ देणे इष्ट होते.

५) पृ. ७२ शेवटची ओळ : ऋग्वेदाचा संदर्भ ८.६९.१५ द्यायचा राहिला आहे.

### (४) अयोग्य संदर्भात संस्कृत वचन

पृ. ९ : उपनिषदातले एक वचन येथे उद्धृत केले आहे. ते अतिशय अशुद्ध छापले आहे ते असे : सत्यस्य अभितं मुखं य त्वं सुवर्णेनं अपावृत. ईशोपनिषदातल्या ज्या पंधराव्या श्लोकाचा तो भाग आहे तो श्लोक असा आहे : ''हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् । तत् त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥'' माहुलकरांना जे सांगायचे आहे त्याच्याशी ह्या श्लोकाचा

संबंध नाही. माहुलकर सांगतात की भाषेचा तुलनात्मक अभ्यास सुरू होण्यापूर्वी संस्कृतचे व्याकरण अपुरे, कांही अंशी चुकीचे होते. नंतर तुलनात्मक अभ्यासामुळे संस्कृत व्याकरणावर नवा प्रकाश पडला. त्यामुळे जे सत्य दृष्टीस पडले ते पाहून इथले विद्वान गडबडून गेले. उपनिषदातल्या श्लोकात सत्यदर्शन झाल्यामुळे कोणी गडबडून गेल्याचे म्हटले नाही. उलट श्लोक तर असे सांगतो की सत्यालाच धर्म मानणारा ऋषी मृत्यू समीप आला आहे हे जाणून पूषन् देवतेला विनंती करतो की त्याने (अंतिम) सत्यावर असलेले (सूर्यरूपी) आवरण दूर करावे ज्यामुळे ऋषी सत्य पाहू शकेल[८]. संस्कृत व्याकरणावर आवरण होते, ते पाश्चात्त्यांनी तुलनात्मक अभ्यासाने दूर केले आणि व्याकरणातले सत्य पाहिले अशासारखी कल्पना माहुलकरांनी केली असल्यामुळे त्यांना उपनिषदातला श्लोक आठवला असावा. पण तो ह्या संदर्भात योग्य नाही. माहुलकर असेही म्हणतात की पाश्चात्त्यांनी सोन्याच्या 'लोभानं' ते झाकण दूर केले. सोन्याच्या लोभाने झाकण हलवणे ह्याला फार निराळा अर्थ आहे. श्लोकात सोन्याचा तसला 'लोभ' कोणालाही नाही.

### (५)काही वाक्यरचना

माहुलकरांचे लेखन निर्दोष आहे. तथापि काही वेळा ते कर्मणि प्रयोग करतात ते ठीक वाटत नाहीत. अशा प्रयोगाची उदाहरणे: 'छेदन केलं गेलं' (पृ. ६२, खालून ६), 'भस्मीभूत केलं गेलं' (पृ. ६२, शेवटची ओळ), 'ग्रथित केली गेली' (पृ. ६३, खालून ४), 'घडलं गेलं' (पृ. ६५. १८), 'दिलं गेलं' (पृ. १३५.१). इंग्रजी भाषेच्या सवयीचा हा परिणाम असावा. पृ. १०१. १६ इथे त्यांनी लिहिले आहे: सोस्यूरचे काही विचार 'रनांच्या विचारांशी मिळते येतात.' रनांच्या विचारांशी जुळतात असे त्यांना म्हणायचे असावे. माहुलकरांच्या त्या वाक्यावर गुजरातीतील, 'मळतां आवे छे' याची छाप दिसते.

### (६) युरोपीय ग्रंथकारांची देवनागरीत नावे

युरोपीय ग्रंथकारांची नावे देवनागरीत देणे ही एक डोकेदुखी असते. अनेकदा आपल्याला उच्चाराची खात्री नसते आणि खात्री असली तरी देवनागरीत उच्चार उतरविणे कठीण असते. अशा प्रसंगी आपण कल्पिलेला उच्चार देवनागरीत आणण्याचा प्रयत्न करून कंसात ते नाव रोमन लिपीत देणे चांगले. माहुलकरांनी ही तारेवरची कसरत बहुतेक ठिकाणी नीट संभाळली आहे. फक्त रोमन लिपीतली नावे लगेच कंसात न देता तळटीपात दिली आहेत. त्यामुळे तळटीपांची संख्या उगाच वाढली आहे आणि वाचकाला फक्त तेवढ्या माहितीसाठी ग्रंथाची पाने मागे पुढे करावी लागतात. माहुलकरांनी कल्पिलेला उच्चार काही वेळा चुकला आहे (पण ह्याबद्दल माझी पूर्ण खात्री नाही, मीच चुकत असेन), किंवा स्वतःला त्यांना खात्री वाटत

नसल्याने एका नावाचे त्यांनी काही वेळा दोन प्रकारे लेखन एकाच पानावर, कित्येकदा अगदी लागोपाठ असणाऱ्या दोन ओळींत, केले आहे. ह्याची उदाहरणे पृ. १०४.३ येथे त्यांनी Sieg आणि Siegling यांचे लेखन सिएग व सिगेलिंग असे केले आहे, ते झीग आणि झीगलिंग असावे. Kielmeyer पृ. १०९.१९) चा उच्चार किएलमेयेर असा नसून कीलमायर असा बहुधा असावा. पृ. ५५ खालून ११ वर कुरिलोविच (Kuryl owicz) ऐवजी कुरवॉविच हवे असे वाटते. Diez या ग्रंथकाराचे नाव एकदा डीत्स (४३, खालून ६), तर दुसऱ्यांदा दिए (४४.१४) असे, Moeller चे एकदा म्योलर (५५.१३) तर पुन्हा मलर (५५.१९) असे, Jevans चे अेकदा जेव्हन्स (८६.२) नंतर जीव्हॉन्स (८६.३). Boehme चे प्रथम ब्योमे (१०७. ३,७) आणि पुढे ब्रोएम्हे (१०९, तळटीप १८) अशी भिन्न आढळतात.

### (७) तळटीपा

माहुलकरांची तळटीपा देण्याची पद्धत सदोष आहे. एकतर त्यांच्या टीपा दोन प्रकारच्या आहेत- १, २,३ अशा संख्यांनी निर्दिष्ट केलेल्या, आणि तारकांकित. यांत ते फ़रक काय करतात ते कळत नाही. बहुधा तारकांकित टीपा मागून सुचल्या असाव्यात. त्याला हरकत नाही, पण तारकांकितांना अनुक्रम संख्या नाही त्यामुळे एखाद्या वाचकाला तारकांकित तळटीप पाहून ती टीप ग्रंथात कुठे आली आहे ते कळायला मार्ग नाही.

तळटीप जर ग्रंथाविषयी असेल तर ग्रंथातला नेमका संदर्भ देणे आवश्यक आहे. नुसते ग्रंथनाम देऊन वाचकाची सोय होत नाही. माहुलकर सुरुवातीस असे काही संदर्भ देतात (उदा. पृ. ९,तळटीप १ इत्यादी ). परंतु पुढे ते असे संदर्भ देत नाहीत. हा फार मोठा दोष आहे. उदा. पृ.८. ७ वर नव्या दृष्टीने केलेल्या संस्कृतच्या अभ्यासाला दिलेले 'युरपिअन संस्कृत विज्ञान' हे नाव वाचकाने तळटीप ८ मधे निर्दिष्ट केलेल्या व्हिटनेच्या (Whitney) Sanskrit Grammar मधे कुठे शोधायचे ? पृ.४३ वर माहुलकरांनी ओल्डेनबेर्गच्या (Oldenberg) ग्रंथातील वाक्याचा अनुवाद दिला आहे . पण पृ. ४९ वरील तिसऱ्या तळटीपेत ग्रंथातला संदर्भ दिला नाही.

माहुलकरांनी ग्रंथात अनेक विद्वानांच्या मतांचा उल्लेख ठिकठिकाणी केला आहे. अशा वेळी माहुलकर तळटीपेत नुसते ग्रंथनाम देतात, नेमका संदर्भ देत नाहीत, काही ठिकाणी तर नुसते ग्रंथकर्त्याचे नाव असते, ग्रंथाचेही नाव असत नाही. अशी उदाहरणे जवळ जवळ प्रत्येक प्रकरणात आढळत असल्याने ती सांगण्याची आवश्यकता वाटत नाही. एक आश्चर्यकारक तळटीपेचे उदाहरण म्हणजे पृ. ११६ वर शेवटच्या ओळीत 'कार्य' या शब्दावर तळटीपेचा आकडा असून पृ. १२० वरील तळटीपेत नुसता action अेसा इंग्रजी शब्द आहे!

(८) मुद्रण दोष

मराठी लेखनविषयक मुद्रणदोष फारसे नाहीत, जे थोडे आहेत (पृ. ९९.१२ स्रोत ऐवजी स्रोत्र) ते सहज लक्षात येण्या सारखे आहेत, ही एक जमेची बाजू आहे. त्यासाठी मुद्रिते तपासणाऱ्यांना धन्यवाद द्यायला हवेत. परंतु इतर अनेक प्रकारचे मुद्रणदोष आहेत, हेही सांगायला हवे.

१)ग्रंथकर्त्यांच्या व इतर काही नामांच्या बाबतीत मुद्रणदोष आढळतात. थोडी उदाहरणे द्यायची झाल्यास ती अशी देता येतील : ग्रंथकर्त्यांचे नाव -पृ. ६७, तळटीप ५ ऐवजी , पृ.७१, तळटीप १४, Pedersen ऐवजी Paderson , पृ. ८४ Jacobson ऐवजी Jacobsohn, तळटीप २७ Lehmann ऐवजी Lohmenn इत्यादी ग्रंथनामे - पृ.४०.११ Sandhi ऐवजी Sandhu. ग्रामनाम -पृ. ७१. तळटीप १४. Goettingen ऐवजी Gohingon. भाषानाम ब्रहुइ (Brahui) ऐवजी जाहुइ पृ.६१.६.

(२) संस्कृत अवतरणे काही वेळा सदोष छापली आहेत. पृ. २५.३ एचो ऐवजी ह्चो, पृ. ४०.६ (झलाम्) ऐवजी (शलाम्) ;

३) इतर काही मुद्रणदोष : पृ. ४०.२ (खालून); 'तालव्य वर्णाशी गोत्र झाला'. बहुधा 'तालव्य वर्णाशी योग झाला' असे माहुलकरांनी लिहिले असावे. अक्षरजुळणी करणाऱ्याने ते गोत्र असे वाचले. देवनागरीत अशी चूक कल्पिणे शक्य आहे. पृ. ९०. ९-१० एका जर्मन वाक्यात Sprache ऐवजी spreche, muss ऐवजी mass, Mitteln ऐवजी Mittein, unendlichen ऐवजी unendliuchen, Gebrauch ऐवजी Geprauch अशा चुका झाल्या आहेत

४) माहुलकर उदाहरणात कित्येकदा शब्दारंभी मोठा (capital) टाइप का लिहितात ते कळत नाही. हा त्यांचा दोष की अक्षरजुळणी करणाऱ्याचा? पृ. २५ ग्रीक शब्द Lepo, Le'loipo, पृ. ५१ लॅटिन शब्द Kentum (तसेच आयरिश शब्द).

ग्रंथात अगदी साक्षेपाने टाळायला हवे होते ते म्हणजे उदाहरणे म्हणून जे शब्द दिले आहेत त्यांतले मुद्रणदोष. थोडी उदाहरणे: पृ. १६, खालून ३, pańca ऐवजी pance, पृ. १७.६, ce ऐवजी ee, पृ. ५१.१२ satam ऐवजी satom, पृ. ६८.४ संस्कृत svasar ऐवजी ivasar, अवेस्ता xanhar ऐवजी xinhar ; पृ. ३७.९ शिंकणे या अर्थी संस्कृतात 'तत्' हा कोणता धातू ? मुद्रणदोष ओळखताही येत नाही.

माहुलकर संक्षेप फार वापरत नाहीत. पृ. १२० तळटीप ५ येथील Tol (याचे पृ. १३९, तळटीप २७ येथे मुद्रण TOI ) Times of India चा संक्षेप आहे हे चटकन लक्षात येणार नाही.

* * *

डॉ. माहुलकरांच्या पुस्तकाची योग्यता आणि नवलाई जाणून प्रकाशकांनी हे पुस्तक प्रसिद्ध केले . त्यांच्या गुणग्राहकतेसाठी ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

माहुलकर शेवटचे काही महिने आजारी होते. ग्रंथावर शेवटचा हात फिरवून प्रकाशनासाठी तो सिद्ध करण्यास त्यांना सवड होती की नाही कल्पना नाही. परंतु प्रकाशनापूर्वी हे पुस्तक एखाद्या अभ्यासकाकडून वाचून घेतले असते तर वर उल्लेखिलेले अनेक दोष, त्रुटी टाळता आल्या असत्या.

ध्वनि, शब्द, अशा भाषेच्या बाह्य अंगांना प्राधान्य देऊन भाषेचा ऐतिहासिक, तौलनिक अभ्यास एवढ्यावरच भाषाविज्ञानीने न थांबता सोस्यूरच्या प्रतिपादनाप्रमाणे भाषा ही एक नवनिर्मितिक्षम प्रतीकव्यवस्था आहे, हे लक्षात घेऊन तिच्या अंतरंगाचा शोध घेणे हा खरा भाषाभ्यास आहे हे माहुलकरांच्या समग्र ग्रंथात अनुस्यूत असलेले सूत्र आहे असा ग्रंथ वाचून माझा समज झाला आहे. असा 'खरा भाषाभ्यास' करण्याचा प्रयत्न कोणी केला आहे की नाही ते त्यांनी ग्रंथात सांगितले असल्यास मला उमगले नाही. काय करायला हवे ते कळले; ते करायची हालचाल झाली आहे का, होत आहे का, झाली असल्यास कितपत सिद्धि प्राप्त झाली आहे हे ग्रंथ वाचून कळत नाही.

माहुलकर माझे मित्र होते. आम्ही दोघे बडोद्याचे असलो तरी परिचय १९५६ पासूनचा. पुढे साधा परिचय वाढत जाऊन घरोबाही निर्माण झाला. त्यांच्याशी होणाऱ्या भेटीगाठीत ते किती विद्वान, बहुश्रुत आहेत त्याचा प्रत्यय येई. पण खरोखर ते किती मोठे विद्वान आणि बहुश्रुत होते ह्याची नीट जाणीव त्यांचे पुस्तक परीक्षणाच्या निमित्ताने वाचले तेव्हा झाली.

त्यांच्या पुण्यस्मृतीस माझी ही चुकली माकली आदरांजली.

**संदर्भ टिपा :**

१) भाषाविषयक ग्रंथांचे काळजीपूर्वक वाचन म्हणजे त्यातील विचारांचे स्वबुद्धीने केलेले उपयोजन. मागच्या पिढीने हे काम केले नाही हे स्पष्ट करताना डॉ. केळकरांनी जी उदाहरणे दिली आहेत त्यांतले एक ग्रासमानच्या नियमानुसार जी ध्वनिपरिवर्तने संस्कृतात झालेली आढळतात तशा प्रकारची मराठीतही आढळतात ह्याकडे कोणी लक्ष दिले नसल्याचे त्यांनी म्हटले आहे. डॉ. केळकरांनी ह्या नियमाची मराठी उदाहरणे दिली आहेत ती अशी: हिंदी धंधा, पण मराठी धंदा; हिंदी ठठ्ठा, पण मराठी थट्टा. काही वर्षांपूर्वी भारतीय इतिहास संशोधक मंडळात कोणत्याशा निमित्ताने मी एक निबंध सादर केला होता. शीर्षक होते: 'ग्रासमानच्या नियमाचा मराठी अवतार.' मी उदाहरणे दिली होती ती अशी: हिंदी -गुजराती भूख, पण मराठी भूक; हिंदी -गुजराती भीख, पण मराठी भीक; हिंदी-गुजराती हाथ, पण मराठी हात, इत्यादी. मी निबंधात असेही म्हटले होते की संस्कृतात दोन लागोपाठ येणाऱ्या महाप्राणांपैकी पहिल्या महाप्राणाचा अल्पप्राण होतो (बिभेमि), तर मराठीत अशा दोन महाप्राणांतला दुसरा

महाप्राण अल्पप्राण होतो (भूक्).

२) पुढे पृ.७० वर माहुलकरांनी सांगितल्याप्रमाणे हा 'सोनियाचा दिवस' खरे तर जोन्सच्या पूर्वी एक शतकभर आधी उगवला होता. न्यूटनचा समकालीन गणिती व तत्त्वज्ञ लाइबनित्स (G. W.Leibniz माहुलकर-लेखन लीबनिझ) याने फिनिश आणि हंगेरिअन या भाषा एकमेकींपासून खूप दूर बोलल्या जात असल्या तरी त्यांच्यातील व्याकरणसाम्यामुळे त्या कोणत्यातरी एका पूर्वकालीन भाषेतून उगम पावल्या असल्या पाहिजेत हे ओळखले होते. पण जो मान जोन्सला मिळाला तो लाइबनित्सला मिळाला नाही.

३) संस्कृतातले शब्द इंडोयुरोपिअनचे अवशेष खरे, पण ते इंडोयुरोपिअनचे 'तुकडे' नाहीत.

४) पृ. ७९. ७ येथे माहुलकर यालाच 'आदेश' म्हणतात. आशीर्वाद आणि आदेश एक नाहीत. आदेश पाळावा लागतो. आशीर्वादात अभिप्रेत असलेली भविष्यकालीन घटना घडेल किंवा घडणार नाही, नक्की नसते. उपदेशाचे मात्र तसेच आहे. तो पाळला जाईल, न जाईल. तेव्हा 'आदेश' ऐवजी उपदेश म्हणणे बरे,

५) सोस्यूरच्या (पृ. ९५, तळटीप १४) 'front' आणि 'back' या शब्दांचा अनुवाद माहुलकरांनी (कागदाची) 'वरील बाजू' आणि 'मागील बाजू' असा केला आहे. 'पुढील' आणि 'मागील' असे म्हटले असते तर बरे झाले असते.

६) दुसरी अशीच सनाच्या बाबतीत झालेली चूक पृ. ४९, तळटीप १४, सन 1934 एवजी 1734 दिला आहे.

७) हा संदर्भ मला डॉ. सु. ज्ञा. लड्डू व डॉ. सौ. प्रतिभा पिंगळे यांनी दिला. मी त्यांच्या आभारी आहे

८) H. Lueders, Varuṇa, 26, 620

***

प्रबोधन सोसायटी, एरंडवणे, पुणे -४११००४

पुस्तक परीक्षण

# चरित्र व आठवणी

चिं. ग. काशीकर

**(लेखिका व प्रकाशिका : जयश्री शंकरन्, पुणे, १९९९)**

पुणे येथील डेक्कन कॉलेज संस्थेत सन १९३९ ते १९७३ या काळात द्राविड भाषाशास्त्राचे प्रपाठक म्हणून अध्यापन आणि संशोधन करून निवृत्त झालेले डॉ. कोईमतूर रामस्वामी शंकरन् यांचे चरित्र आणि आठवणी यांचा संग्रह त्यांच्या कन्या जयश्री शंकरन् यांनी करून पित्याच्या ऋणातून मुक्त होण्याचा प्रशंसनीय प्रयत्न केला आहे. डेक्कन कॉलेजच्या भाषाविभागातील त्यांचे सहकारी प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ प्रा. अशोक केळकर यांनी या पुस्तिकेला छोटासा पुरस्कार लिहिला आहे. प्रा. शंकरन् यांचे परिचित आणि इष्टमित्र यांनी लिहिलेल्या आठवणी यात नोंदल्या आहेत. प्रा. शंकरन् यांनी लिहिलेले ग्रंथ आणि संशोधनपूर्ण निबंध यांची सूची जोडलेली आहे. त्यांच्या मार्गदर्शनाने ज्यांनी पीएच्.डी पदवीसाठी प्रबंध लिहिले त्यांची यादी जोडली आहे.

प्रा. शंकरन् हे तामिळनाडूमधील कोईमतूरचे रहिवासी सन १९०८ मध्ये त्यांचा जन्म झाला. सन १९९९ मध्ये त्यांचे निधन झाले. त्यांना पूर्ण आयुष्य लाभले. तथापि जन्मापासून त्यांची दृष्टी अधू असल्यामुळे त्यांना आपल्या दीर्घ आयुष्याचा पूर्ण सदुपयोग करता आला नाही. त्यांचे शिक्षण चेन्नई येथे झाले. प्रा. कुप्पुस्वामी शास्त्री यांच्या हाताखाली जे नामंकित विद्यार्थी तयार झाले, त्यांच्यापैकी प्रा. शंकरन् हे एक होते. संस्कृत, इण्डो-युरोपीय भाषाशास्त्र आणि द्राविड भाषाशास्त्र यांचा अभ्यास त्यांनी केला.

सन १९३९ मध्ये पुणे येथे डेक्कन कॉलेज संस्थेची स्थापना झाली. तेथे द्राविड भाषाशास्त्राचे प्रपाठक म्हणून त्यांची नेमणूक झाली आणि तेथूनच ते निवृत्त झाले. भाषेमधील ध्वनी हा त्यांचा खास अभ्यासाचा विषय होता. त्यावर त्यांनी चिंतन मनन केले आणि आपले निष्कर्ष लेखनिबध्ध केले. युरोप खंडात या विषयात रस असलेल्या विद्वानांचे लक्ष प्रा. शंकरन् यांच्या लेखनाकडे गेले. जर्मनीमध्ये बॉन येथील विद्यापीठात अभ्यागत प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. भाषेला, नादाची तात्त्विक चिकित्सा करू इच्छिणाऱ्या विद्वानांना प्रा. शंकरन् यांचे लेखन निश्चितपणे मार्गदर्शक ठरेल.

ते एक विचारवंत तत्त्वज्ञ होते. संगीताचे विशेषत: उत्तर भारतीय संगीताचे त्यांना आकर्षण होते. सॉऑफी संप्रदायाचे ते अनुयायी होते. भारतातील भक्तिसंप्रदायाच्या इतिहासात दक्षिणेतील आळवार संतांच्या साहित्याला महत्त्वाचे स्थान आहे. प्रा. शंकरन या साहित्याचे

आणि त्याच्या संगीताचे शौकीन होते. 'भाषा आणि जीवन' च्या वाचकांना अशा भक्ताचे जीवनकार्य उद्‌बोधक वाटेल.

***

१४८९, सदाशिव पेठ, पुणे-३०

( हेच मराठी पुस्तक इंग्रजी भाषेत C. R. Sankaran and His Lifelong Pursuit of Nāda प्रसिद्ध झालेले आहे. सप्टें. २००० मूल्य ५०/-)

---

## मराठीत अक्षरक्रम देण्याची पद्धत

मुद्दे मांडताना किंवा गटवारी दाखविताना इंग्रजीची नक्कल करून मराठीत सर्रास अबकड... अशी अक्षरमालिका वापरली जाते - ABCD च्या अनुकरणातून.

अनेकदा हे पाहिल्यावर एक आठवण झाली. मी नागपुरात शाळेत शिकत असताना, साधारण १९५० ते ५४ या काळात, आमचे मराठी व संस्कृत शिकवणारे पाठक मास्तर एक वेगळीच गमतीदार पद्धत अवलंबीत असत. प्रश्नपत्रिका काढताना ते छोट्या छोट्या अक्षरमालिका वापरीत, उदाहरणार्थ मनोहर, कमलं, अरविंद, श्रीराम, शंकरपुत्र, वगैरे.

सर्वांनी अनुसरण्याजोगी अक्षरमालिका कशी असावी याचा विचार करताना मला सुचलेली कल्पना अशी: पाच -सात संख्येपर्यंत जाणारी छोटी मालिका हवी असल्यास 'कचटत पय' ही अक्षरमालिका वापरावी. यापेक्षा मोठी अक्षरमालिका हवी असल्यास स्वरांचाही त्यात समावेश करावा. उदा. अ अी अू अे ओ क ग च ज ट उ त द ...

घोटाळा टाळण्यासाठी अै, औ, टाळले आहेत.

अमराठी भाषक स श ष, त थ च छ इत्यादी वर्णांमध्ये उच्चारभेद ठेवू शकत नाहीत. ही अडचण लक्षात घेतली आहे.

शरद कृष्णाजी बोडस, अद्वैतानंद सोसायटी, १२२१ सदाशिव पेठ, पुणे -३०.

---

## विषय येईना माध्यम वाकडं !

बोस- आइनस्टाइन सांख्यिकी गणिताचे एक शोधक सत्येन बोस माझ्याजवळ बोलताना एकदा म्हणाले की

''जर एखादा बंगाली म्हणाला की त्याला बांगला भाषेत भौतिकी शिकवायला जमणार नाही तर याचं कारण त्याला बांगला नीट येत नाही हे नाही तर त्याला भौतिकी नीट येत नाही हे आहे!''

(देवीप्रसन्न पट्टनायक (मैसूरच्या भारतीय भाषा संस्थान चे माजी संचालक) 'लँग्वेज टीचिंग अॅट द टर्शरी लेव्हल', समावेश: प्रशांत सिन्हा (संपादक), हायर एज्युकेशन: चॅलेंजिज अँड व्हिझन्ज, पुणे : पुणे विद्यापीठ, १९९९ पृ. ३०२.)

---





अनुक्रमणिका

# भाषाविवेक

अॅमॉस ऑझ हे इस्रायली लेखक म्हणजे ज्यू! 'इस्रायलचा आधुनिक प्रेषित' असा कांही पाश्चात्त्य वृत्तपत्रांनी त्यांचा गौरव केला आहे. महत्त्वाचं म्हणजे ऑझ हिब्रू भाषेत लिहितात. त्यांचं साहित्य ते स्वत:, तर कधी इतर भाषांतरकारांच्या साह्याने इंग्लिशमध्ये भाषांतरित करतात. जगभरातील अठ्ठावीस भाषांमध्ये त्यांच्या कादंबऱ्या , निबंध भाषांतरित झाले आहेत. 'उत्तम इंग्लिश येत असूनसुद्धा तुम्ही हिब्रू भाषेत का लिहिता?' असा प्रश्न एकदा त्यांना मुलाखतकाराने विचारला होता. तेव्हा ऑझ म्हणाले, ''ज्या भाषेत मी जन्मलो , ज्या भाषेत मी हसतो, रडतो, विचार करतो, बायकोशी भांडतो , ज्या भाषेत शिव्या घालतो त्याच भाषेत मी चांगलं आणि प्रामाणिक लिहू शकतो.''

हिब्रू एक विलक्षण भाषा आहे. बोली हिब्रू ही खरी अस्तंगत झाली होती. गेल्या शंभर वर्षांत आधुनिक हिब्रूचा परत उदय झाला. पाश्चात्त्य आणि पौर्वात्य अशा विविध देशांतून ज्यू जेरूसलेमला आले आणि स्थायिक झाले. त्यांच्या मायबोली निरनिराळ्या होत्या. पण त्यांच्या धर्मग्रंथांची, धर्मव्यवहाराची भाषा हिब्रू होती. पंडिती वादविवाद हिब्रूत होत. त्यामुळे रशियन ज्यू असो वा जर्मन ज्यू, त्याला थोडीफार हिब्रू येतच होती. जेरूसलममध्ये स्थायिक झालेल्या या ज्यूंना जोडणारा हिब्रू हा दुवा होता. अशा तऱ्हेने हिब्रूचा परत उदय झाला. हिब्रूने इतर भाषेतील शब्द आपलेसे केले. हिब्रू ज्ञानव्यवहाराची आणि रोजच्या व्यवहाराची भाषा झाल्यामुळे तिला ऊर्जितावस्था आली, हे जरी खरे असले तरी अॅमॉस ऑझ म्हणतात, ''ज्यावेळी ज्यू तरूण - तरूणींनी , 'मी तुझ्यावर प्रेम करतो / करते' हे हिब्रूत सांगायला सुरूवात केली त्यावेळी हिब्रू खरी जिवंत झाली.'' सतरा शतके हे घडले नव्हते. भाषा प्रेमव्यवहाराची होते तेव्हा ती जिवंत राहते. विझू लागलेली हिब्रू इतकी तेजाळली की एस्. वाय् अॅग्नन या हिब्रू लेखकाला वाङ्मयाचे नोबेल मिळाले . ए. बी. येहोशुआ, डेव्हीड ग्रॉसमन या मोठ्या लेखकांनी हिब्रू आणखी समृद्ध केली.

'ललित' एप्रिल १९९९ 'वेचक आणि वेधक'
(डॉ. आनंद जोशी 'अॅमॉस ऑझ इस्रायली लेखक' )मधून.

# शुध्दलेखन

दिवाकर मोहनी

भाषा आणि जीवन (१८:१/हिवाळा २०००/...३७) मध्यें डॉ. द. न. गोखले ह्यांनी माझ्या अनावृत पत्राला दिलेला प्रतिसाद वाचला. त्याला उत्तर देणे मला आवश्यक वाटतें. हे उत्तर त्यांच्या मृत्यूनंतर मला द्यावे लागत आहे ह्याचे मला अतीव दुःख आहे; आणि ते दुःख तीव्रतर करणारी आणखी एक घटना घडली आहे. माझे अनावृत पत्र जून ९९ मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर त्याची प्रत एका निवेदनासोबत मी डॉ. गोखले ह्यांजकडे पाठविली होती. त्यानंतर जुलैमध्ये मी त्यांना भेटावयाला गेलो होतो. त्यावेळी त्यांनी माझे पत्र वाचलेले असेल अशी अपेक्षा मी केली होती. पण त्यांनी ते वाचलेले नाही असे समजल्यामुळे मी त्यांच्याजवळ हा विषय काढला नाही. त्यांनी ते तेव्हा वाचलेले असते तर त्यांना त्यांच्या हयातीतच उत्तर देणे शक्य झाले असते. असो, आता नाइलाज आहे. डॉ. गोखले ह्यांनी ते पत्र वाचले हे मला आपल्या हिवाळा २००० च्या अंकावरून समजले आणि मनात आले की मी ते माझे अनावृत पत्र आधी आपल्याकडेच प्रकाशनार्थ पाठवावयाला हवे होते. कारण आपल्या पत्रिकेची प्रतिष्ठा आजचा 'सुधारक' ला अद्याप आलेली नाही. आपण ते आजचा सुधारकमधून उद्धृत केल्याबद्दल आपणास हार्दिक धन्यवाद.

माझा आणि डॉ. गोखले ह्यांचा मतभेद फार थोडा आहे. पण जो आहे तो मौलिक आहे म्हणून हे विस्तृत पत्र लिहिण्यास मी उद्युक्त झालो आहे.

''भाषेची अप्रमाण रूपे सतत बदलत असतात. जसा टापू बदलतो तशी भाषा बदलते. जसा काळ जातो तशी जुनी रूपे जाऊन नवी येतात. हे मोहनीना आणि सर्वच भाषाभ्यासकांना मान्य आहे. पण प्रमाणभाषाहि बदलते हे ध्यानी घेतले पाहिजे. फरक एवढाच की अप्रमाण भाषा जितक्या वेगाने बदलते तितक्या वेगाने प्रमाणभाषा बदलत नाही. ती सावकाश बदलते पण बदलते.'' हा त्यांचा मुख्य मुद्दा आहे. पुढे त्यांनी प्रमाणभाषा कशी बदलत गेली आहे त्याची उदाहरणे दिली आहेत. माझा मुख्य मुद्दा सातत्याचा आहे. लिखित भाषेमधली प्रमाणीकृत शब्दांची रूपे बदलू नयेत ह्या माझ्या प्रतिपादनावर मी आजही ठाम आहे. माझा मुद्दा मी आता थोड्या वेगळ्या पद्धतीने मांडतो. तसे केल्याशिवाय डॉ. गोखल्यांचा आणि माझा मतभेद कोठे आहे ते स्पष्ट होणार नाही.

प्रमाणीकरण आणि सातत्य हे पर्यायी शब्द आहेत असे मी मानतो. लिखित रूपांमध्ये सातत्य राखल्याने प्रमाणीकरण होते आणि प्रमाणीकरण केल्याने सातत्य येते ,





अनुक्रमणिका

असे माझे मत आहे. एकदा एका शब्दाचे प्रमाणीकरण झाले की त्याला कधीहि अप्रमाण ठरविता येत नाही. ती चूक आमच्या शुद्धलेखनाच्या नियमकर्त्यांनी केल्यामुळे आमची मराठी भाषा मरू घातली आहे. त्यांनी प्रमाणमराठीचे मरण ओढवून घेतले आहे.

कोणत्याहि भाषेचा शब्दसंग्रह सतत वाढत असतो. कालच्या आणि आजच्या भाषेची तुलना केल्यास आजची भाषा शब्दसंख्येच्या दृष्टीने अधिक समृद्ध आहे हे कोणालाही सहज मान्य होईल. कोणताही लेखक त्याच्या प्रमाणीकृत भाषेतील पूर्ण शब्दसंग्रह वापरत नाही, वापरू शकत नाही. आयुष्यभरात प्रमाणभाषेमधले सगळे शब्द वाचण्याचा त्याला प्रसंग येत नाही. तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी रसायनशास्त्राशी संबंधित असतोच असे नाही. शेतकऱ्याला लागणारे शब्द रंगाऱ्याला लागत नाहीत. सुताराला किंवा गवंड्याला ज्यांची गरज असते ते सर्व शब्द चांभाराच्या उपयोगाचे नसतात. (प्रमाणीकृत भाषेमध्ये मात्र सगळ्याच शब्दांचा अंतर्भाव होत असतो, होऊ शकतो किंवा तो पुढे मागे व्हावा अशी अपेक्षा असते.) पण म्हणून सुतार आणि चांभार वेगळी भाषा बोलत नसतात. ही शब्दांची निवड केवळ विषयाप्रमाणे किंवा व्यवसायाप्रमाणेच बदलते असे नाही तर देशकालाप्रमाणेसुद्धा बदलते हे मला मुळीच नाकबूल नाही. प्रमाणभाषेतल्या प्रचंड शब्दसागरामधला काही अंश एका काळात किंवा एका विशिष्ट प्रदेशात वापरला जाणे म्हणजे प्रमाणभाषा सावकाश बदलणे असा होत नाही. पूर्वीचे काही शब्द मागे पडणे आणि नवे शब्द वापरात येणे ह्याचा अर्थ प्रमाणभाषा बदलणे असा होत नाही. डॉ. द. न. गोखले जेथे लक्षात घेत नाहीत तेथे दुसरे कोण घेणार ? डॉ. गोखले ह्यांच्या हेतूच्या प्रामाणिकपणाविषयी माझ्या मनामध्ये अजिबात शंका नाही पण त्यांचे अतिशय प्रांजळ असे प्रतिपादन वरील गैरसमजावर आधारलेले असल्यामुळे मला ग्राह्य नाही.

आता प्रमाणभाषा म्हणजे काय आणि ती बदलत असल्यास कशी ते पाहू. लिखित प्रमाणभाषा ही ' नियमांनुसार लिहिलेली ' भाषा अशी एक ढोबळ व्याख्या करता येईल. मुद्रित भाषा म्हणजे प्रमाणभाषा नव्हे. मुद्रणाचा भाषेच्या प्रमाणीकरणावर परिणाम होतो किंवा झाला आहे हेही मी समजतो. मुद्रण सुरू झाल्यावर भाषा पूर्वीपेक्षा सावकाश बदलू लागली हे मला मान्य आहे. पण माझे वरील वाक्य सामान्यतः भाषेबद्दल आहे प्रमाणीकृत भाषेबद्दल नाही. लिहिलेली प्रमाणीकृत भाषा शब्दांच्या निवडीच्या बाबतीत बदलावी - तिला त्या बाबतीत धरून बांधून ठेवावे असे माझे म्हणणे नाही - पण ती शब्दांच्या लिखितरूपांच्या बाबतीत बदलू नये हे माझे मत डॉ. गोखल्यांचा लेख काळजीपूर्वक वाचल्यानंतरही कायम आहे. माझा पूर्ण युक्तिवाद, माझे प्रतिपादन लिहिल्या गेलेल्या भाषेबद्दल आहे, बोलण्यातल्या प्रमाणभाषेबद्दल नाही. शब्दांची डोळ्यांना दिसणारी रूपे पूर्वी जशी लिहिली जात होती. तशीच ती पुढेही लिहिली जावी असे मी म्हणतो

त्याला एक अट आहे. ती अट अशी की, ती रूपे नियमाप्रमाणे घडविली गेली असतील तर.

डॉ. गोखल्यांनी दादोबाची जी वाक्ये उदाहरणादाखल घेतली आहेत तीच मीही घेतो. त्याही (त्यांनी) हे रूप दादोबांच्या मताप्रमाणे व्याकरणशुद्ध असेल तर ते आजही प्रमाण मानले गेले पाहिजे. ते तसे वापरण्याला कोणाची आडकाठी नको. मात्र तो शब्द ''तयहिं'' असा लिहिला जाऊ नये. त्याचे डोळ्यांना दिसणारे रूप तसेच कायम ठेवावे. ''तिआहिं '' अशी केवळ उच्चार दाखविणारी रूपे प्रमाण मानू नयेत. ''त्याही''मधला फक्त अनुस्वार काढून टाकण्यानेसुद्धा त्या रूपामधले सातत्य नष्ट होते. त्यासाठी असे लेखन अप्रमाण मानावे.

''उच्चारायास'' हे रूप जर आज मी वापरले तर ते अप्रमाण मानण्यात येऊ नये. तो प्राचीन (archaic form) किंवा आर्षप्रयोग आहे असे मानण्यात यावे. जुन्या, नियमानुसार घडविलेल्या रूपांना अप्रमाण मानण्याचे कारण काय ते मला समजू शकलेले नाही. ''ह्मणोन हे'' रूप नियमाप्रमाणे घडले आहे किंवा कसे हे मला माहीत नाही. त्यामुळे ह्म ऐवजी म्ह हे जोडाक्षर वापरणे इष्ट आहे असे मी मानतो. म्हणोनसारख्या मराठी (देश्य) शब्दामध्ये ह्म हे संस्कृत अक्षर वापरणे चुकीचे वाटल्यामुळे पुढच्या पिढीतल्या लेखकांनी त्याचा वापर केला नाही. ह्मणोनमधल्या ह्म ला दादोबांनी वापरलेले अप्रमाण रूप असे म्हणावयास माझी हरकत नाही.

विशेष (बदल) हा शब्द आज आपण त्या अर्थाने वापरत नाही पण त्याचा हा अर्थ कोशात दिला असेल आणि तो तसा कोणास वापरावयाचा असेल तर त्यास तो वापरण्यास प्रत्यवाय करण्याचे कारण काय ? मात्र तो कोणाच्या तरी उच्चाराप्रमाणे विशेश, विसेश, विषेश असा लिहिल्यास त्याचे ते रूप अप्रमाण मानावे इतकेच माझे म्हणणे आहे. सातत्य, एक शब्द विशिष्ट अर्थाने पुन्हापुन्हा वापरल्यामुळे येते आणि तो शब्द कोशात येतो. तो शब्द कोशात समाविष्ट झाल्याने स्थिरावतो. त्याचा वापर पुढे होईनासा झाला तरी त्यामुळे तो अप्रमाण ठरण्याचे कारण नाही. कोशगत शब्दांचे सातत्य सिद्ध झालेले असते. त्यांचा वापर खंडित झाल्याने ते नष्ट होत नाही असे मी मानतो. तो शब्द ठेवणीतला आहे असे मी समजतो.

पंतोजी, काढितात, अर्द्धा ही प्राचीन किंवा आर्ष रूपे आहेत. ती पर्यायी रूपे म्हणून वापरता येतीलच. आज उत्तर पेशवाईच्या किंवा अव्वल इंग्रजीच्या काळातील नाटक कादंबऱ्यांमध्ये ती खुशाल वापरावी. किंबहुना तीच वापरावी. (आम्ही आज होन आणि मोहोर ही नाणी वापरीत नाही. पण म्हणून ते शब्दच प्रमाण भाषेमधून काढून टाकावयाचे हा न्याय कोठला ! ) तेथे अर्वाचीन रूपे वापरू नयेत आणि जर ती जुनी-

काढितात, अर्द्धा-रूपे कोणी वापरली तर ती अप्रमाण भाषा वापरल्याबद्दल लेखकाला दंड होऊ नये.

थोडक्यात काय तर जुन्या नियमानुसार केलेले लेखन अप्रमाण होत नसते. नव्या लेखकांनी जुन्या लेखनपद्धतीचा वापर विवेकाने करावा. पर्यायी रूपे भाषेमध्ये असणारच! काल सूचित करण्यासाठी ती आज उपयोगी पडतात. इतकचे नाही तर त्यांच्या योगाने वाचकाला कोणत्याही काळात एकदम शिरता येते.

हे शब्दांच्या लेखनाविषयी झाले. आता वाक्यांविषयी - पर्यायी रचना म्हणून ती सगळी वाक्ये मला मान्य आहेत. तशी रचना आज प्रचारात नाही म्हणून ती रचना आज चुकीची ठरत नाही. आणि चुकीची म्हणून दंडार्हदेखील ठरत नाही. अर्थात् ती व्याकरणाच्या पुस्तकात आलेली असेल तर. व्याकरणाची रचना पूर्वी झालेले लेखन लक्षात घेऊन केलेली असावी. पूर्वी झालेले लेखन समजून घेता यावे ह्यासाठी व्याकरण रचलेले असावे.

माझे सर्व प्रतिपादन हे लेखनासंबंधी असल्यामुळे आणि लेखनातील सातत्य म्हणजे शब्दांतील ऱ्हस्वदीर्घ, अनुस्वार त्याचप्रमाणे श ष स, न ण, ल ड र य अशा उच्चारांशीं संबंधित असल्यामुळे डॉ. गोखल्यांचे प्रतिपादन मला भरकटल्यासारखे, मला अभिप्रेत असलेला संदर्भ सोडून केल्यासारखे वाटते. माझ्या पूर्वीच्या लेखावरून ते स्पष्ट होत नसेल तर त्याचा दोष मजकडेच येतो.

लेखनामध्ये सातत्य असावे म्हणजे नवीन शब्द प्रमाणभाषेमध्ये घेऊनयेत असे नाही. पूवी जे शब्द जसे लिहिले जात होते तसेच ते पुढेहि लिहिले जावे. पूर्वी अस्तित्वात नसलेले शब्द- नवे शब्द- वापरामध्ये आणताना त्यांचे लिंगवचनसामान्यरूपां विषयीचे अनुशासन शक्यतो लवकर करून ते छापताना पाळावे. एकमेकाना पत्रे लिहिताना- स्वतःची रोजनिशी लिहिताना तेच अनुशासन पाळले पाहिजे असे नाही. पत्रात परस्परांना मान्य संकेत वापरावे. छापताना सर्वमान्य संकेत वापरावेत. इतकाच माझा आग्रह आहे. हे पूर्वी पासूनचे सर्वमान्य असलेले संकेत सार्वकालिक आहेत असे मानून उच्चाराप्रमाणेच लिहिणे योग्य असे म्हणून किंवा कोणाच्या लहरीप्रमाणे (मग ती राज्यकर्त्यांची का असेना) बदलू नयेत. ह्या नियमामध्ये क्वचित भर घालता येईल, पण त्यापैकी कोणताही रद्द करता येणार नाही असे मला वाटते. प्रमाणभाषेच्या लेखननियमामध्ये केलेला बदल तिच्या विकासाला बाधक ठरतो आणि जे विकासाला बाधक ते मारक, हे माझे मत अजून बदललेले नाही.

उच्चाराप्रमाणे लेखन का नको ते आता मांडतो.

(१) पहिले कारण असे की प्रमाण लेखन कोणाच्या उच्चाराप्रमाणे ह्या प्रश्नाचे उत्तर देणे अतिशय अवघड आहे. हा प्रश्न काढल्याबरोबर एकच भाषा पण वेगळ्या बोली बोलणाऱ्या लोकांमध्ये श्रेष्ठकनिष्ठ भाव निर्माण होण्याची शक्यता असते. प्रमाणभाषेच्या

प्रगतीसाठी तिला अशा वादांपासून दूर ठेवणेच इष्ट आहे. येथेच आणखी एक मुद्दा घेता येईल. सगळ्या भाषांमध्ये परक्या भाषांमधले शब्द सतत येत असतात. त्यांचे उच्चार कधीकधी आपल्या स्थानिक उच्चाराहून फार वेगळे असतात. (ते अनेकदा मूळ भाषेतले साधित शब्द असतात ही आणखी एक अडचण.) ते उच्चारांप्रमाणे लिहिणे अशक्यप्राय असते. संस्कृतभाषेमधून आपण खूप मोठा शब्दसंग्रह उसना घेतला आहे. उसना कसचा तो आपलाच झाला आहे. संस्कृतभाषेमधले ऋ आणि ष हे दोन वर्ण कोणत्यातरी भारतीय भाषेत मुळाबरहुकूम उच्चारले जात असतील काय असा विचार मनात आल्यावाचून राहत नाही.

(२) लेखन डोळ्यांसाठी असल्यामुळे शब्दांची एकाच प्रकारची आकृती डोळ्यांना दिसणे वाचनाला उपकारक ठरते. ज्या आकृतीशी पूर्वपरिचय नसतो त्या समजून घेण्यासाठी निरखाव्या लागतात. त्यामध्ये वाचकाचा व्यर्थ कालक्षेप होतो. अर्थनिश्चयनाला विलंब होतो. द्रुतवाचनासाठी शब्दांची आकृती आणि तिचा अर्थ अशी सांगड वाचकाच्या मनात बसणे योग्य असते. अर्थात् येथे ऱ्हस्वदीर्घ, अनुस्वार अशांबद्दल मी मुख्यत्वे म्हणत आहे हे ध्यानी घ्यावे. अनियमित किंवा वारंवार बदललेल्या नियमांप्रमाणे केलेले लेखन वाचकाच्या मनामध्ये संदर्भ निर्माण करण्याचे कार्य तर करीतच नाही - उलट असेलेले संदर्भ नष्ट करते. रांभौ हा शब्द उच्चाराप्रमाणे लिहिलेला आहे. तो रामभाऊ असा लिहिल्या इष्ट संदर्भ निर्माण करीत नाही. प्रत्यक्ष बोलताना जे संदर्भ हजर असतात ते लेखनात आणताना उच्चारापेक्षा आणखी काही खुणांचा आश्रय करणे आवश्यक असते. आपली विरामचिन्हे ते काम करतात. तसेच काम ऱ्हस्वदीर्घांच्या, अनुस्वारांच्या खुणासुद्धा करीत असतात. अव्यये ऱ्हस्वान्त ठेवण्याचा किंवा त्यावर अनुस्वार देण्याचा हेतू तो शब्द अव्यय म्हणून ओळखता यावा एवढाच होता. ''मला खाऊ दे'' आणि ''मला खाऊं दे'' ह्या वाक्यांमधला खाऊ हा शब्दनाम केव्हां आणि क्रियापद केव्हा हे अनुस्वारासारख्या खुणेशिवाय डोळ्यांना समजावून देता येणे अवघड आहे. जेव्हा एकाच उच्चाराचे वेगवेगळा अर्थ दाखविणारे शब्द भाषेत असतात तेव्हा त्याच्या लेखनात फरक करणे इष्ट असते. त्यांच्या लेखनात फरक केल्यामुळे वाचकाला त्या शब्दाकृतीचा अर्थ निःसंदिग्धपणे समजण्यास मदत होते ह्यात संशयच नाही. ऐकताना पूर्ण वाक्य ऐकून अर्थबोध होतो. वाचताना मधलेमधले शब्द पाहून जर नीट अर्थ स्पष्ट होऊशकत असेल तर ती सोय ठेवावी लागते. त्यासाठी जितक्या शब्दाकृती निश्चितार्थ दाखवू शकतील तितक्या हव्या असतात. एकाच उच्चाराच्या निरनिराळ्या शब्दांच्या लेखनात कोठे अनुस्वाराचे, कोठे ऱ्हस्वदीर्घांचे म्हणजे Spelling चे फरक ठेवून हे कार्य साधता येते हे समजल्यानंतर लेखनाचे तसे नियम होतात. (नाव-नांव, काठी-कांठी, right-write-rite, sun-son, blew-blue, soul-sole, their-





अनुक्रमणिका

there इत्यादी)

नवीन शब्दांची भर भाषेमध्ये सतत पडत राहावी असे जर वाटत असेल तर त्या नव्या शब्दांमध्ये काही समानोच्चारांचे असणार हे गृहीत धरुन डोळ्यांना अर्थभेद स्पष्ट व्हावा म्हणून त्यांच्या लेखनांतील ऱ्हस्वदीर्घ, अनुस्वार ह्यांचा फरक कायम राखणे इष्ट आहे.

उच्चाराप्रमाणे लेखन करणे उचित नसण्याचे कारण तसे केल्याने प्रत्येक शब्द मोठ्याने उच्चारून त्याचा अर्थ समजून घेणे आवश्यक होते. ह्या संदर्भात पूर्वी रांभौं चे उदाहरण दिले आहे. शब्दाच्या लिखित रूपाने उच्चारासोबत अर्थ सांगावा अशी अपेक्षा आजवर राखण्यात आली आहे. ज्या भाषांमध्ये लेखनाची आणि आता मुद्रणाची परंपरा आहे त्यांच्या ठिकाणी उच्चाराबरोबर अर्थ - लेखकाच्या मनांतील आशय किंवा अभिप्राय (जो बोलणारा आपल्या आवाजाच्या चढउतारांतून दाखवतो तो) व्यक्त करण्याची सोय करण्याचा यत्न दिसतो असे माझे मत आहे. लेखनामध्ये आलेला शब्द जर साधित शब्द असेल. मुद्दाम, कृत्रिमपणे घडविलेला असेल - तर तो कसा घडला हे दाखविण्याची सोय व्याकरणकारांनी ठेवली आहे. उदाहरणार्थ, वाङ्मय हा शब्द. त्याचा उच्चार वांग्मय असे लिहूनहि दाखविता येतो. पण वांग्मय असे लिहिल्यानंतर त्याचे वाक्+मय हे अवयव दुर्लक्षित होतात. सन्यास आणि संन्यास ह्या दोन शब्दांच्या उच्चारांत फरक नाही. सन्यास असे लिहून न्यास (ठेवणे) ह्या शब्दामागे सं हा सम्यक् ह्या अर्थाने वापरलेला उपसर्ग आहे हे कळावयाचे कसे? अशी उदाहरणे आणखीही पुष्कळ देता येतील.

उच्चारा प्रमाणे लेखन का न को ह्याची वरच्याशिवाय आणखी काही कारणे आहेत. माझा मुख्य आक्षेप साधित शब्दांचे लेखन एका फटक्याऱ्या सरशी बदलण्याला आणि हा बदल न केल्यास ते दण्डाई ठरविण्याला आहे. कोणत्याही प्राधीकरणाला ते दण्डाई ठरविण्याचा अधिकार असू नये. हा अधिकार मराठीच्या बाबतीत सरकारने वापरल्या मुळे प्रमाण -परिकृत मराठीच्या मागे पूर्वी असलेले संमोनद (Sarvetion) नष्ट झाले. ती शिथिल झाली परिणामी प्रमाण मराठी वाचण्याची वाचकाची संवय गेली. नवीन नियम लागू होऊन आज चाळीस वर्षे होत आली. चाळिशीच्या आतल्या फार थोड्या लोकांना प्रमाण मराठी वाचण्याची सवय राहिली आहे. मराठी विश्वकोशातील अप्रतिम नोंदीना तरुण वाचकच नाहीत. त्यांना साधेसाधे विषयसुद्धा वाचावयाला कठिण वाटतात. ह्या साऱ्याचे कारण आमच्या शुद्धलेखन विषयक नीतीमध्ये दडले आहे असे माझे वैयक्तिक मत आहे.

***

**मोहनीभवन, धरमपेठ, नागपुर ४४००१०**





अनुक्रमणिका

# वर्ष १८, २००० ची लेखन सूची

## लेखक सूची

**लेख सूची**

---

मराठी अभ्यास पत्रिका - 'भाषा आणि जीवन' चे बदललेले संपर्क पत्ते

संपादकीय पत्रव्यवहार आणि परीक्षणार्थ पुस्तके :

मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट, ४६. एरंडवन, पुणे - ४११००४
दूरध्वनी : ५४३३८६९

व्यवस्थापकीय संपर्क आणि पैशाचा भरणा

नीलिमा गुंडी, ३ अन्नपूर्णा, १२५९ सुभाषनगर, ५ वी गल्ली, शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.





अनुक्रमणिका

## सूचना फलक

वर्ष १८ : अंक ३ पावसाळा २००० या अंकातील चुकींची दुरुस्ती आणि खुलासा

१) विजया देव यांचा दूरध्वनी क्रमांक असा हवा ९५२२ - ४९५ १७००

२) मृणालिनी कामत यांच्या लेखाचे शीर्षक असे हवे-
ऐसा अस्तु गेला माझारिचि। आयुष्यभानु।
(ज्ञानेश्वरी ६:४३२)

३) सत्त्वशीला सामंत यांच्या ''मराठी लेखनाची 'दूरावस्था' '' या लेखावर दिलेल्या संपादकीय टीपे मध्ये ''लेखाचे शुद्धलेखन अगदी अपवाद म्हणून. जुनेच ठेवले आहे'' असे म्हटले होते. परंतु मुद्रण नव्या शुध्दलेखनाच्या नियमांप्रमाणेच केले गेले आहे. त्यामुळे प्रस्तुत लेखातील शुध्दलेखनामध्दे काही ठिकाणी विसंगती निर्माण झाली आहे.
याचुकी बद्दल आम्ही लेखिका आणि वाचक यांची क्षमा मागतो.

४) सत्त्वशीला सामंत यांनी मराठी लेखनाच्या दूरावस्थेचे एक उदाहरण म्हणून 'दूरावस्था' हे अवतरणचिन्हांकित लेखन उपरोधाने केले आहे परंतु हे नसमजल्यामुळे काही वाचकांकडून ''खुद्द लेखिकेने असे चुकीचे लेखन कसे केले'' अशी विचारणा करणारी पत्रे आली आहेत म्हणून हा खुलासा.

५) सितांशु यशश्चंद्र यांच्या 'भाषा' या कवितेच्या अनुवादक पद्मा मेहता यांचा पूर्ण पत्ता असा - 'मैत्री', ९१/३/१०-ए, शिक्षक नगर, ७ वी गल्ली, पौड रस्ता,
पुणे ४११०३८

-संपादक

## महाबँक पारितोषिक

मराठी अभ्यास परिषदेच्यावतीने प्रतिवर्षी मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनास बँक ऑफ महाराष्ट्र या संस्थेने पुरस्कृत केलेले महाबँक पारितोषिक दिले जाते. २००० सालातील पारितोषिकासाठी डॉ. हरिश्चंद्र बोरकर यांच्या 'झाडी बोली: भाषा आणि अभ्यास ' या ग्रंथाची निवड करण्यात आली होती. हे पारितोषिक या वर्षा पासून रोख ५०००/- रुपायांचे करण्यात आले आहे. या वर्षीचे पारितोषिक १६ डीसेंबर २००० राजी डॉ. वि. बा. प्रभुदेसाई यांच्या हस्ते दिले गेले.

पारितोषिक निवड समिती डॉ. नीलिमा गुंडी (निमंत्रक), प्रा. लीला अर्जुनवाडकर आणि डॉ. अंजली सोमण यांची होती.

## परिषदेच्या पदाधिकाऱ्यांमध्ये दोन महत्त्वाचे बदल

पत्रिकेचे प्रमुख संपादकपद या अंकानंतर डॉ. विजया देव सोडत आहेत. त्यांच्या जागी डॉ. मृणालिनी शहा या प्रमुख संपादक राहतील. संपादकीय पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करावा:-

१ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवन, पुणे ४११००४. दूरध्वनी : ५४३ ३८६९

परिषदेचे कार्यवाहपद २००१ पासून डॉ. मृणालिनी शहा यांच्या ऐवजी डॉ. निलिमा गुंडी सांभाळतील. तरी या पुढे या सर्व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार संपर्क, पैशाचा भरणा पुढील पत्त्यावर करावा.

३, अन्नपूर्णा, १२५९ सुभाषनगर, ५ वी गल्ली, शुक्रवार पेठ, पुणे - ४११००२
दूरध्वनी : ४४८ ६०१५

अर्थात डॉ. विजया देव - आणि डॉ. निलिमा गुंडी संपादक मंडळावर यापुढेही राहतील. वरील सर्व बदलाची कृपया नोंद घ्यावी.

१. **‘मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन’ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे:

**वार्षिक वर्गणी -**

संस्थेला १०० रु.
व्यक्तीला ७५ रु.
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

२. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी रोखीने किंवा धनादेश /मनिऑर्डर ने देता येईल. धनादेश ‘मराठी अभ्यास परिषद’ या नावाने काढावा. धनादेशासोबत/ मनिऑर्डर कूपनवर आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी हे अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. पावती दिली जाईल. वर्गणी व तत्संबधी पत्रव्यवहाराचा पत्ता : मृणालिनी शहा, कार्यवाह, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे- ४११००४

३. **मागील अंक :**

‘भाषा आणि जीवन’ हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु २०/-

४. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक ‘निवडक भाषा आणि जीवन’ (किंमत रु.२००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच ‘भाषांतर मीमांसा’ हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनकडे उपलब्ध आहे.

५. **जाहिरातीसाठी दर :**

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५०रु, शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन/चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३



# इंग्रजीची खिडकी मराठीचे डोळे



**मराठी भाषेबद्दल अशा प्रकारची सुटसुटीत आणि चटकदार संदेश वाक्ये हवी आहेत.**

संपर्क :
**मराठी अभ्यास परिषद**
१ शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे,
पुणे ४११००४. (दूरध्वनी ५४३३८६९)



अनुक्रमणिका